भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ५१

# ऐतिहासिक फारसी साहित्य

## तृतीय खंड



# Persian Sources of Indian History

## Vol. III

*By*
**Ganesh Hari Khare**

*Curator, B. I. S. Mandala*

संपादक—गणेश हरि खरे

क्युरेटर भा. इ. सं. मंडळ

श. १८६१ ]          किंमत १॥ रु.          [ A. D. 1939

| पृ. | ओ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५ | १७ | इ. १६५९ | इ. १६४९ |
| ३९ | ६ | शव्वाल | शाबान |
| ४२ | २ | इ. १६५८ | इ. १७०७ |
| ५१ | टीप ओ. ३ | एक फार्सी अनोळखी | رسوم...ممالک |
| ५७ | टीप ओ. २ | ४१ | ४५ |
| ५८ | ,, | ४६ | ४५ |
| ६० | ,, | ४६ | ४५ |
| ६१ | ,, | व इतर , | व ' यार मर्थीफ ' सेरीज इतर |
| ६१ | ,, | ४६ | ४५ |
| ६४ | टीप ओ.२ व ६ | ४६ | ४५ |
| ६६ | २१ | १०२१ व १०२९ | १०२९ व १०७१ |
| ७१ | ५ | इ. १५२६ | इ. १६२६ |
| ८१ | १९ | १९व्या ओळीपुढें '[समासांत*] ... ... پروانگو [خلاصجاں وزیر حلومت' असा मजकूर घालणें | |




पुणें, पेठ भांबुर्डा घ. नं. ११५।१ येथें आर्यभूषण छापखान्यांत रा. रा. विठ्ठल हरि बर्वे यांनीं छापिलें आणि प्रो द. वा. पोतदार आणि श्री. सर. गं. ना. मुजुमदार यांनीं ११२।३ सदाशिव पेठ पुणें २ येथें प्रसिद्ध केलें.

# प्रस्तावना

१

ऐतिहासिक फार्सी साहित्याचा हा तिसरा खंड आज पुरा होत आहे. याचीं पानें मंडळ त्रैमासिकाचें वर्ष १८ अंक ३ व ४ आणि वर्ष १९ अंक १, २ व ४ यांत क्रमशः आलीं असून त्यांत तीन प्रकरणांत मिळून ६५ लेख प्रसिद्ध झाले आहेत. हे कागद अगडी, गदग, चिसरहळ्ळि, लक्ष्मेश्वर व साळशी अशा पांच देसाई घराण्यांतील असून ते मंडळातर्फे संशोधनासाठीं कर्नाटकांत हिंडत असतां पूर्वी शिवचरित्रसाहित्य खंड ६ मध्यें प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांच्या संगतीनेंच मला मिळाले होते. पण हे भागशः प्रसिद्ध करावयाचें ठरल्यामुळें त्याचें पुस्तक संपण्यास एवढा विलंब लागला. उपर्युक्त देसायांनीं आपले अस्सल कागदपत्र संपादनासाठीं आजपर्यंत मंडळांत ठेवले याबद्दल मंडळातर्फे मी त्यांचा फार आभारी आहे.

हे कागद मंडळांत आल्यानंतर नक्कलण्याचें काम मंडळाचे मुनशी व मी अशा दोघांनीं केलें असून पुढील सर्व काम मुख्यतः मींच उरकलें आहे. हे कागद छापतांना सामान्य धोरण दुसऱ्या खंडाचेंच ठेविलें आहे. त्याप्रमाणें खुलाशाच्या टीपा ज्या त्या पत्राखालीं यावयास पाहिजे होत्या. पण मूळ कागदाचें यथातथ्य रूप समजण्यासाठीं आवश्यक अशा टीपाच पुष्कळ झाल्या व त्या ज्या त्या पत्राखालीं देणें अपरिहार्य होतें. यामुळें खुलाशाच्या टीपा शेवटीं दिल्या आहेत. पत्राचा कालानुक्रम त्यांची समजूत पडण्यास फार मदत करतो, म्हणून तो शेवटीं दिला आहे. आदिलशाही फर्मानें महाराष्ट्रांत फार मिळतात. तीं उलगडण्यास त्यांवरील शिक्के व तुघ्रे समजून घेणें अगदीं आवश्यक आहे. म्हणून या शिक्क्यांच्या अभ्यासाचें फलितही ग्रंथास जोडलें आहे. शेवटीं सूची दिली असून तींत अपरिचित गांवांची ओळख करून देण्याचा शिवसा खंड ६ प्रमाणें यत्न केला आहे.

अशा तऱ्हेनें सजविलेल्या या पुस्तकाचें महत्त्व संपादकास कितीही वाटलें तरी त्याची खरी किंमत अभ्यासक त्याचें स्वागत कसें करतात यावर अवलंबून आहे.

२

ह्या कागदांत आलेल्या ऐतिहासिक माहितीचा खुलासा टीपांमधून केला आहे. पण असे कित्येक मुद्दे आहेत कीं, ते टीपांत चर्चिले असते तर अधिक जागाही लागती व वारंवार पुनरुक्ति झाली असती. अशापैकीं तिहींचा परामर्श येथें घ्यावयाचें योजिलें आहे.

कित्येक आदिलशाही फर्मानांच्या शेवटीं 'परवानगी हुजूर...' व 'वस्सलाम सान...' अशीं एक किंवा दोन वाक्यें असतात. पैकीं पहिलें वाक्य फर्मान हुजूरच्या म्हणजे राजाच्या परवानगीनें निघालें असें सांगतें. प्रत्येक राजाज्ञा राजाच्या संमतीनें निघावयास पाहिजे. तेव्हां पहिला शेरा फर्मानावर असल्यास तो अनुरूपच आहे असें म्हटलें पाहिजे. पण दुसरा शेरा कशासाठीं ? त्या शेऱ्याचा अर्थ त्यांत उल्लेखिलेल्या मनुष्याच्या मार्फतीनें असा होतो.

आतापर्यंत आदिलशाही फर्मानें पुढील लोकांच्या माहितीनें निघाल्याचें आढळून आलें आहे. (१) किश्वरखान (सरे नौबत), (२) मिजाजखान, (३) दिलावरखान (सरसरे नौबत, अमीरे जुम्लह, नव सरसरे नौबत), (४) शाहनवाजखान (मज्लिसी हुजूर, सरे मज्लिस, वजीरे हुकूमत), (५) इख्लासखान (अमीरे जुम्लह, वजीरे हुकूमत), (६) दियानतुल्मुल्क (अमीरे जुम्लह, सरे मज्लिस), (७) मुस्तफाखान, (८) दौलत खवासखान (सरखवासे हुजूर), (९) खानभाई, (१०) रेहान इख्लासखान, (११) अमीनुल्मुल्क (वजीरे हुकूमत), (१२) शाह अबुल-हसन, (१३) सय्यिद नूरुल्लाह (सरखेले ममालिक), (१४) मसऊदखान. पैकीं फक्त मिजाजखान व खानभाई या नांवाविषयीं शंका येते. बाकी सर्व नांवें बरोबर आहेत. यांतील पहिले सहा २ ऱ्या इब्राहीमच्या कारकिर्दींत होते. ७ ते ११ व इख्लासखान हे मुहम्मदच्या कारकिर्दीत आढळतात. २ ऱ्या अलीच्या कारकिर्दीत फक्त १३ वा सांपडतो आणि १४ वा केवळ सिकंदरच्या राजवटींत होता असें दिसतें. इख्लासखान हें नांव नव्हे पदवी आहे. इब्राहीम आदिलशाहाच्या कारकिर्दींतील इख्लासखानाचें नांव काय होतें तें समजत नाहीं. पण शेवटीं दिलेल्या शिक्क्यांवरून व शिचसा ६।३४, ४१ यां वरून रैहान, यूसुफ, मुहम्मद व खानखानान असे आणखी चार इख्लासखान ठाऊक झाले आहेत. यांपैकीं फक्त खानखानानचा शिक्का फर्मानावर नाहीं. बाकीचे फर्मानांवरील शिक्क्यांमुळेंच ओळखूं आले आहेत.

शिक्क्यांत अथवा फर्मानांच्या समासांत उल्लेखिलेलीं उपर्युक्त मनुष्यें कोणी अधिकारी असलीं पाहिजेत हें उघड आहे. हे अधिकारी निरनिराळ्या काळीं कोणत्या अधिकारावर होते तें त्या त्या अधिकाऱ्यांच्या पुढें कंसांत दिलें आहे. सरखवासे हुजूर (खाशा नोकरांचा मुख्य), सरे नौबत (सेनानी), अमीरे जुम्लह (फडणीस), सरखेले ममालिक (घोडदळाचा मुख्य), सरे मज्लिस (सभापति) यांचे अर्थ कंसांत दर्शविल्याप्रमाणें असावे. मज्लिसी हुजूर व वजीरे हुकूमत यांचे निश्चित अर्थ कोणते हें मात्र समजत नाहीं. अर्थ कांहीं का असेनात. कित्येक फर्मानें फक्त राजाच्या परवानगीनें, तर कित्येक राजाच्या परवानगीनें व कोणा

प्रधानाच्या माहितीनें कां मुद्रावी याचा नीट उलगडा होत नाहीं. पण मला असें वाटतें कीं, केवळ लष्करी हालचालींचीं फर्मानें फक्त राजाच्या परवानगीनें सुटत, तर कारभार, महसूल इत्यादि प्रकरणांतील फर्मानें कोणा तरी प्रधानाच्या माहितीनें निघत. एकाच वेळीं अनेक प्रधान असल्यानें निरनिराळ्या खात्यांसंबंधीं सुटलेल्या एकाच वेळच्या फर्मानांवर भिन्न प्रधानांच्या माहितीचे शेरे आढळणें स्वाभाविक आहे व तसे ते आढळतातही.

अनेक आदिलशाही फर्मानांत सुहूर व हिजरी अशा दोन्ही कालगणनांचे उल्लेख असतात. हे कधीं एकमेकांशीं जुळते आढळतात, तर कधीं हिजरी सुहूरच्या पुढें गेलेला सांपडतो. अशा वेळीं दोन्ही गणनांचा मेळ कसा घालावयाचा हा प्रश्न पडतो. याचें उत्तर मीच मागें शिवाजी निबंधावली भाग २ पृष्ठ ८९ वर देण्याचा प्रयत्न केला आहे; पण तो उलगडा आज मला समाधानकारक वाटत नाहीं. केवळ लष्करी हालचालींच्या फर्मानांवर सुहूरचा उल्लेख प्रायः आढळत नाहीं. तेव्हां त्याचा संबंध कारभारविषयक प्रश्नांशीं असला पाहिजे. या व इतर खंडांतील अनेक फर्मानांवरून असें दिसतें कीं, विजापुरी राज्यांत सुहूर गणनेचें वर्षच राज्यकारभारांत प्रमाण मानलें जाई. अर्थात् नवीन नेमणुकी, बदल्या, इनामें व मोकासे काढणें, देणें, अदलाबदल, निरनिराळ्या वसुल्या या सर्व सुहूर वर्षावर चालत. तेव्हां अशा कोणत्याही बाबींसंबंधीं फर्मान असलें व त्यावर सुहूर सनाचा उल्लेख सांपडला तरी त्याचा फर्मानाच्या तारखेशीं कांहीं संबंध नसून त्यांत उल्लेखिलेल्या इनामादि विषयांशीं तो निगडित आहे असेंच समजलें पाहिजे. यामुळें सुहूर व हिजरी यांचा मेळ आहे कीं नाहीं हें पाहण्याची तादृश आवश्यकता नाहीं व तो नेहमीं घसेलच असेंही मानवत नाहीं. हा मुद्दा नीट समजण्यासाठीं येथें एक महत्त्वाचें उदाहरण देतों. 'मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास' या पुस्तकांत हि. १०८१ जमर १५ या तारखेचीं ६ फर्मानें प्रसिद्ध झालीं आहेत[१]. यांत बाजी घोरपड्यानें बजाविलेल्या सेवेबद्दल त्याच्या मुलास पांच परगणे सुहूर १०६८ पासून इनाम दिले आहेत. येथें फर्मानांतील सुहूरपेक्षां हिजरी साल ३ वर्षांनीं पुढें आहे. तीं फर्मानें छापतांना सुहूरचा उल्लेख चुकला असावा अशी माझी कल्पना होती; पण आज मला तसें वाटत नाहीं. तें इनाम सुहूर १०६८ पासून बाजीच्या मुलाकडे चालू झाल्याचें धरावयाचें येवढाच त्याचा अर्थ आहे. यावरून सुहूर सन आणि त्याच्या निर्देशापूर्वी प्रत्येक फर्मानांत ز| (पासून) हा शब्द आढळतो तो दोन्ही बहुतेक ठिकाणीं सहेतुक असतात असें म्हणता येतें[२].

---

१ परिशिष्ट अ पृ. ७०–७७. २ यास कांहीं फर्मानांचे अपवाद आहेत; पण तो सुहूर सनाचा उल्लेख करण्याचे रूढीच्या अंधानुकरणाचा परिणाम असावा.

पण मग येथें हा प्रश्न उत्पन्न होतो कीं, ज्या आज्ञेचा अमल एका विशिष्ट कालापासून बसावयाचा तो त्या कालानंतर कांहीं महिन्यांनीं अथवा वर्षांनीं यावयाचा हें कितपत युक्तिसिद्ध आहे ? यावर माझें उत्तर असें—अनेक फर्मानांचा सूक्ष्म अभ्यास असें दाखवितो कीं, तीं ठराव मुद्दतीच्या मोहिमांचे किंवा विनंत्यांचे निकालरूप असतात. तेव्हां त्यांत निकालाचे मागेपूर्वीच्या कालाचा उल्लेख आल्यास नवल नाहीं. आजही कित्येक दाव्यांचे निकाल होऊन मागील अनेक वर्षांचें वेतन, इनामी उत्पन्न इत्यादींच्या पैशाची भरपाई करण्यांत येते. मग पूर्वीच्या दिरंगाईच्या काळांत तसें होत असल्यास त्यांत अपूर्व असें काय आहे ? तात्पर्य फर्मानांतील शुहूर सनाचा उल्लेख त्या फर्मानाच्या कालाचें निर्णायक गमक होऊं शकणार नाहीं.

या ग्रंथांत प्रसिद्ध केलेल्या फर्मानांत कांकी ( कानिके ), पारकी ( पेरिके ), नदी टोकरा, गावहर्दुखाना, कावली असे पांच सामान्यतः महाराष्ट्रांतील कागदपत्रांत न आढळणारे हक्क उल्लेखिले आहेत. कानिके म्हणजे नजर व पेरिके म्हणजे विनंति, प्रार्थना. तेव्हां दोहोंचा अर्थ नजर म्हणून व विनंति करण्यासाठीं द्यावयाचे कर असा होईल. नदी उतरण्यासाठीं कर्नाटकांत कानडे व पाबु यांच्या आपल्याकडील कावडीप्रमाणें मोठ्या पाट्या करतात त्यास टोकरी म्हणतात. तेव्हां नदी टोकरा म्हणजे नदी उतरण्याच्या सोयीसाठीं घेतलेला कर होय. गाव हर्दुखाना म्हणजे गांवची आयुधशाळा, अर्थात् आयुधशाळेसाठीं घेतलेला कर. कानडी कोशांत कावलीचे रक्षण, रक्षक, गोठा, इत्यादि अर्थ दिले आहेत. तेव्हां कावलीचा परचक्रापासून रक्षण करण्यासाठीं द्यावयाचा कर असा अर्थ पुढें झाला असावा.

अक्षय्य तृतीया शक १८६१ { . ग. ह. खरे.

# अनुक्रमणी.



# संक्षेप



अ., अ. आ.–अली आदिलशाह
आ–आग्नेय
ई–ईशान्य
उ–उत्तर
ऐफासा–ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड व लेखांक
चो–चोफोली
जु.–जुलूस सन
द–दक्षिण
द. म. इ. सा.–दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड व पृष्ठ
न., ना. अ.–नादर अली
नै–नैर्ऋत्य
प– पश्चिम
पू– पूर्व
फा– फार्सी
मु., मु. आ.–मुहम्मद आदिलशाह
मो–मोठा
[ मो. जा. * ] – मोकळी जागा
वसीरे.– वसीरे हुकूमत
वा.– वाटोळा
शि.– शिक्का
शिचप्र–शिवचरित्रप्रदीप
शिचसा., शि. च. सा.–शिवचरित्रसाहित्य खंड व लेखांक
शिभा–शिवभारत
सो.–सरे मजलिस
सु.–सुहूर सन
हि–हिजरी सन
हुप–हुजूरच्या परवानगीनें



# ऐतिहासिक फारसी साहित्य

## तिसरा खंड

—०—

## १ अगडी–देसाई

या प्रकरणात प्रसिद्ध होत असलेले कागद मला अगडी ( हावेरी–धारवाड ) येथें श्री. आबासाहेब व श्री भय्यासाहेब बहादुर देसाई याजकडे मिळाले. यांचे दोन भाग पडतात एक असल कागद व दुसरा पुस्तक किंवा घडीच्या रूपानें असलेले नकल कागद या नकल कागदांचीं मूळेंही त्यांजपाशीं होतीं पण तीं एका मिनामार्फत भाषांतर करण्यासाठीं कोणा परकी गृहस्थाकडे दिलीं असून अजून त्यांच्या हातीं आलीं नाहींत यामुळें काहीं कागदांच्या बाबतींत नकलावरच काम भागवावें लागत आहे. नकलांतील नेहमीचे दोष यांतही असणार हें उघड आहे.

| | | |
|---|---|---|
| हे १ सु ९८३<br>हि. ९९१ शाबान २० | १<br>الملک لله | श १५०५ भाद्रपद वद्य ७<br>इ १५८३ आगस्ट २९ |

فرمان همایون شرف صدور یافت بجانب کارکنان [*و] دیسایان [*و] مقدمان و رعایای فرمات بورلے بوکے مقامات (معاملات) معامله بنکاپور آنکه شهور سنه ثلاث ثمانین و تسع مایه هملت کوندا را [*بر] مراحم پادشاهانه و عواطف خسروانه ممتاز و سرافراز کردانیده سردیسای فرمات مذکور نصب فرموده شده است که مدراث ابدی و سرمدی او بوده باشد می باید که سردیسای گری باو رجوع داشته بر دوام قاعده رعایت عزت نمایند و جمیع رعایاے در ماده گردند و حلال حواری دیوان تابع سخن او بوده باشند و در جمیع امور و اقدام نماید و نواحی کوشند و آنچه در باب تمشیت و تقویت مرام و رایت معلوم نمایند بعمل موافق ساختہ بجا[*ا]ورند تا دایلند انعام

مهالی (انلی) کہ باو مرحمت فرموده شده است بدین تفصیل

| | | |
|---|---|---|
| لوازم در کوئے | امهالی درکهدے | انعام زمین یکن تخم |
| سہ جتل | ہر دو حصہ | پلچ گرو |
| باغ یک قطعہ | چہا [*ر] پالیلی | |

بدین موجب سال بسال جاری دارند و دنبالہ نمایند درین باب تجاوز ننمایند کہ با او مرحمت فرموده دهانیده شده است تعلیق نوشتہ گرفتہ اصل باز دهند برحکم فرمان همایون روند ۲۰ ماه شعبان المعظم سنہ ۹۹۱

بروانگی حضور اشرف اعلی و سرسرنوبت با علاقہ خان عالیشان دلاور خان امیر جملہ (جملہ) کہ بلدست محال خان اعظم بلال خان مسطور است

[मोर्तब*] विपु संवछर शेके १५०३

[ सारांश* ]

२ रा इब्राहीम आदिलशाह→ कारकून, देसाई, मुकद्दम व रय
कर्यात होरलीपोटी मामले संकाप

हणमंतगौडास बादशाही कृपेनें उपर्युक्त कर्यातिच्या सरदेसगतीच
मिरास नेमून दिली आहे. त्याजकडे ती चालवून तिच्या धान्यास मा
द्यावा. रयतेनें त्याच्या सल्ल्याप्रमाणें वागून सरकारशीं निष्ठा दाखवावी. त्या
दिलेल्या इनामाचा तपशील असा : पाच कुडो बियाणाची जमीन
दरखंडीस...चार पायली, दर गोणीस तीन जितल, लवाजिमा व बागेच
एक तुकडा. येणेंप्रमाणें सालोसाल चालूं ठेवावें. ता. २० शाबान सन ९९
[हि.*], सु. ९८३. हुजूरच्या परवानगीनें व दिलावरखानाच्या माहितीनें.

| | | |
|---|---|---|
| ले. २ सु. ९८३<br>हि. ९९१ शाबान २२ | २* | श. १५०५ भाद्रपद वद्य<br>इ. १५८३ आगस्ट ३१ |

[मोर्तब*] विपु संवछर शेके १५०३

---

*यांत आलेला फार्सी मजकूर मामुली व जवळजवळ वरच्या सारखाच असल्यामुळें गाळला आहे. फक्त सारांश दिला आहे.

[ सारांश* ]

२ रा इब्राहीम आदिलशाह → खुर्शीदखान नायब गैबत व कारकून मामले दारुल-फतह बंकापूर

हनुमंतगौडास बादशाही कृपेनें उपर्युक्त मामल्यांतील कर्यातींच्या सरदेसगतीची मिरास नेमून दिली आहे. त्याजकडे ती चालवावी व तिच्या धाऱ्यांस मान याचा. रयतेनें त्याच्या सल्ल्यांत राहून व त्यास मदत करून सरकारशीं निष्ठा दाखवावी. त्यास दिलेल्या इनामाचा तपशील: मौजे लक्ष्मापूर कर्यात तिळवळ्ळी, दर गोणीस उभा मार्गे तीन जितल, कर्यात होरलीपोटी मध्यें दर गोणीस ३ जितल, पाच कुडो बियाणाची जमीन, दर खंडीस चाळीस ( चार ) पायली, एक बागेचा तुकडा, कर्यात राणे बेन्नूर, सरदेसायाकडे पूर्वी चालूं होती ती बाग, शिवाय होलीपली मौजा, उभा मार्ग दरगोणीस ३ जितल, दर खंडीस चार पायली, केरूर खुर्द कर्यातींत दर गोणीस ३ जितल, बागेचा एक तुकडा व पाच कुडो बियाणाची जमीन. हें सर्व कायम समजून वंशपरंपरेनें त्याजकडे चालवावें. ता. २२ शाबान सन ९९१ [ हि.* ], सु. ९८३. हुजूरच्या परवानगीनें व दिलावरखानाच्या माहितीनें.

२

| | | |
|---|---|---|
| ले. ३<br>हि. १०३५ जिल्हेज १८ | هوالعابل<br>الملک لله | श. १५४८ भाद्रपद वद्य ५<br>इ. १६२६ आगस्ट ३१ |

فرمان همایون شرف صدور یافت آنکه دیسائی پرگنه لوتل
بداند که درین وقت شجاعت [*و] رفعت دستگاه مدرعلی رما
حوالدار معامله بنکاپور و بعضی محالات در باب دولتخواهی و
جانسپاری که او در مصلحت کنگ نایک حرام خوار بظهور
می رساند بدرگاه والا معروض داشته بود روشن شد شاد
باش که این معنی مستحسن طبع اشرف گردید چون او
دیسائی حلال خوار و میراث دار قدیم است می باید که نیز
هم در باب سرانجامی مصلحت آنطرف جانب مشارالیه بگوید
دالموجب سرانجام نماید که موجب سرافرازی او است

تا دانند بر حکم فرمان اشرف رود تحریراً فی ۱۸ شهر ذیقعده
سنه ۱۰۳۵

پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی با علام
وکیل السلطنه العلیه العالیه فرزندی شاه نواز خان مهر معلق
(معلی) و وزیر حکومت

[मराठी°] क्रोध नाम संवत्सर शके १५४७

[ सारांश° ]

२ रा इब्राहीम आदिलशाह → देसाई परगणे गुलठ

सांप्रत मामले चंदापूर व इतर महाल यांचा हवालदार मीर अली रजा याने, हामसोर केंगनायक यांजवरील मसलतीच्या बाबत त्याने ( देसायाने ) राजनिष्ठा व प्राणार्पणबुद्धि दाखविली तिजविषयी, लिहिलें तें समजलें व पसंतीस आलें. शाबास. तो जुना, मिरासदार व एकनिष्ठ देसाई आहे. त्याने त्या बाजूच्या मसलतीच्या व्यवस्थेबाबत तो (हवालदार) सांगेल त्याप्रमाणें करावें. तें त्याच्या उत्कर्षास कारण होईल. फर्मानाप्रमाणें अमल करावा. ता. १८ जिल्काद सन १०३५ [हि.°] हुजूरच्या परवानगीनें व शाहनवाज-खानाच्या माहितीनें.

डे. ४ } ४ { श. १५५२ कार्तिक वद्य १०
हि. १०४० रसर २४ } نقل { इ. १६३० नोव्हेंबर १९

پروانه سپه خان والاشان شیر خان فوجدار و جاگیردارا
پرگنه هوکے مذکور از قرار تاریخ بیست چهارم ۲۴ ربیع الثانی
سنه ۱۰۴۰ آنکه عاملان پرگنه هوکے مذکور حاکم سرکار بدانند که
خدمت دیسمکهی و دیسپاندگی محل مذکور بدستور سند سابق
بهلبی گونده دیسمکهی و دیسپاندیه آنجا مقرر داشته رسوم
دیسمکهی سرصدی دوازده نیم هون و رسوم دیسپاندگی
سه صد هون دهد و موضع بیرگونده تصیم دیسمکهی و موضع
دادرربی تصیم دیسپاندی پرگنه مسطور که بموجب سند سابق
دستور انعام اوست بدستور سند سابق موافق گذاشته باشند
مزاحم نشوند و نقل پروانه گرفته اصل واپس بدهند هرسال

استدعای سند مجدد ملك درين باب تاكيد بليغ شناسند قلمی شد
[मोडींत*] प्रमोदूत संवछर शोके १५५२

[ सारांश* ]

शेरखान फौजदार व जागीरदार परगणे होळे होन्नूर → अमलदार परगणे होळे होन्नूर जागीर सरकार

वरील महालाच्या देशमुखीची व देशपांडगीची चाकरी पूर्वीच्या सनदेप्रमाणें तेथील देशमुख व देशपांडे हनुमंतगौडा याकडे कायम आहे. देशमुखीचा रुसूम ३१२॥ होन आणि देशपांडगीचा रुसूम २०० होन घरण(?), शिवाय देशमुखीच्या नात्यानें बन्यहगोंद्री आणि देशपांडकीच्या नात्यानें दावरपी–दोन्ही वरील परगण्यापैकीं–हीं गावें पूर्वीच्या सनदेप्रमाणें त्यास इनाम आहेत. तरी वरील गोष्टी त्याजकडे चालवाव्या. अडथळा करूं नये. ता. २४ रबिलाखर सन १०४० [ हि.* ]

५

| | | |
|---|---|---|
| शे. ५ सु. १०२९<br>हि. १०४८ शाबान ३ | هو الجليل<br>الملك لله | श. १५६० मार्गशीर्ष शुद्ध ४<br>इ. १६३८ नोव्हेंबर २९ |

[नाद् अलीचा शिक्का* ]

فرمان همایون شرف صدور یافت بعامل دیسایان پرگنه
بنکاوتی انکه از شهور سنه تسع ثلاثین و الف از راه مراحم
بادشاهانه و فرط عواطف خسروانه پرگنه مذکور در وجه مقاصالی
هنمنت گوده مع کل باب مرحمت فرموده بحالند شده است
می باید که پرگنه مذکور بدستور نمایند و در نص و تصرف او
باز گذارند تا دانند بوحکم فرمان اشرف روند تحریراً فی
سیوم شهر شعبان سنه ۱۰۴۸

بپروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی ۱ [ समासांत* ]

---

१ पाठीवर मोडींत 'फर्मान देसाई बनावती बमागुला', हणमनगौ, हणमंतगौडास मोकासा' व कानडींत [illegible] असे शेरे.

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → देसाई परगणे गंगावती

परगणे मजकूर हनुमंतगौडा यास मुकासा म्हणून दिला आहे. तरी तो त्याच्या ताब्यांत द्यावा. ता. २-शाबान सन १०४८ [हि.*], सु. १०३९. हुप.

६

| | | |
|---|---|---|
| लें. ६ सु. १०४२<br>हि. १०५१ शव्वाल४ | هوالخلیل<br>الملک لله | श. १५६३ पौष शुद्ध ६<br>इ. १६४१ डिसेंबर २७ |

فرمان همایون شرف صدور یافت بجانب دیسایان پرگنہ گنگاوتی آنکه از شهور سنہ اثنی و اربعین و الف ازراه مراحم پادشاهانہ و فرط عواطف خسروانہ پرگنہ مذکور بابت نوسنچلی نسبت اورچپا نایک دیسائی پرگنہ کنکیری در وجہ استقاست مقدم الامثال هنمنت گونده دیسای سمت کونل مع کل باب مرحمت فرموده دهانیده شده است می باید کہ پرگنہ مذکور دنبالہ نمایند و در قبض و تصرف مشارالیہ بار گذارند تادالله برحکم فرمان اشرف روند تحریراً فی التاریخ چهارم ماه شوال سنہ ١٠٥١

پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → देसाई परगणे गंगावती

कनकगिरीचा देसाई ऊरचप्पा नायक याजकडेचा नौसंचणीचे बाबतींतील परगणे मजकूर ( गंगावती ) मुत्तल समतेचा देसाई हनुमंतगौडा याजकडे सर्व बाबींसह मुकासा म्हणून दिला आहे. तरी वरील परगणा हनुमंतगौडाच्या ताब्यांत द्यावा. फर्मानाप्रमाणें अमल करावा. ता. ४ शव्वाल सन १०५१ [ हि.* ], सु. १०४२. हुप.

७

हे. ७ सु. १०४४ } هوالجليل { श. १५६५ फाल्गुन शुद्ध ११
हि. १०५३ जिल्हेज ९ } الملک لله { इ. १६४४ फेब्रुवारी ८

[ मु आ रहान वा. शि* ]

فرمان همایون شرف صدور یافت نعات عرب و رفعت
دستگاه سدی دلاور حوالدار و کارکنان حال و استقبال معاملم
بکاپور آنکه از شهور سنه اربع و اربعین و الف درین ولا هنمنته
گونده دیسائی سمت گوتل معاملم مذکور بدرگاه معلی التماس
نمود کم نارگوندکی سمت مذکور و سمت هرکلی و سمت
هورلی پولی و سمت کردر خورد و سمت تاولی معاملم مذکور
میراث قدیم خود است و نوکرتر میشود درین وقت کریم شرزه
عز واقع معلوم نموده فرمان حاصل کرده است خود نارگونده
قدیم میراثی ام نظر عنایت ارزانی داشتم نارگوندکی های
قدیم خود نمود مقرر و مستقیم فرموده فرمان حضمت عاطفت
شود نابران احوال بخاطر مبارک اعلی آورده نارگوندکی ها
مذکور از کریم شرزه دور نموده بر هنمنت گونده مذکور مقرر
و مستقیم فرموده شده است می باید کم نارگوندکی سمت
هائی مذکور بر هنمنت گونده مذکور مقرر دانستم دسالم لمایلد
و روان دارند بعد او باولاد و احفاد او جاری سازند تعلق
نوشتم کردند اصل فرمان باز دهند بر حکم فرمان اشرف روند
تحریراً فی ۹ شهر ذی الحجه سنه ۱۰۵۳

پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی ۱ [समाप्त*]

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → सीदी दिलावर हवालदार व कारकून मामले बकापूर

या वेळीं हनुमतगौडा देसाई समत गुत्तल मामले मजकूर यानें दरबारास विनति केली कीं, मामले मजकुरांतील गुत्तल, हडगली, होरटपोली,

१ पाठीवर कानडीत ಉಮಿತು ಮೊಹರು [illegible] व मोडीत ' निा हणमतगोडा गुत्तल ' असे शेरे.

रर सुर्दे व तिळसल्ली या समतांच्या नाडगौडकीची मिरास पूर्वीपासून
ही आहे व भोगोटा चालू आहे. सध्या करीम शर्सर याने खोटें सांगून
र्मान मिळविलें आहे. मी जुना मिरासी नाडगौडा आहे. तेव्हां कृपादृष्टीनें
त्या जुन्या नाडगौडच्या मजकडे कायम करून तसें फर्मान व्हावें. ही
कित मनास आणून उपर्युक्त नाडगौडच्या करीम शर्सरकडून दूर
रून हनुमंतगौडाकडे कायम केल्या आहेत. तरी त्या त्याजकडे मुकरर
ल्या आहेत असें समजून वंशपरंपरा हुमाले कराव्या व चालू ठेवाव्या.
. ९ जिल्हेज सन १०५३ [हि.*], सु. १०४४. हुप.

८

| | | |
|---|---|---|
| ८ सु. १०४५<br>. १०५४ शव्वाल १० | والعامل<br>الملک لله | श. १५६६ मार्गशीर्ष शुद्ध ११<br>इ. १६४४ नोव्हेंबर २० |

[मु आ ल्हान श. पि*]

فرمان همایون شرف صدور یافت نعات دیسایان حه
رتهلی آنکه از شهور سنه خمس و اربعین و الف از راه مراد
پادشاهانه و فرط عواطف خسروانه قریات رایی بلور حه
مذکور یافت انکس خان در وجه استقامت خان عالی شا
سعادت نشان رفیع القدر و المکان خوند منر انکس خان مع ؟
یاب مرحمت فرموده دهانیده شده است می باید که قریا
مذکور دسالم نمایند و در ضبط و تصرف خان عالی شا
موصی الیه باز گذارند تادانند برحکم فرمان اشرف اقدس
همایون اعلی روند تحریرا فی التاریخ دهم ماه شوال سنه ۱۰۵۴
समासात* ] १ پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → देसाई हिसार रद्देहळ्ळी

हिसार मजकुरापैकीं अकुसखानाच्या बाबतींतील कर्यात राणे बेन्नूर
न्द मीर, अंकुसखान यास सर्व बाबींसह दिली आहे तरी ती उपर्युक्त
नाच्या ताब्यात यावी. ता. १० शव्वाल सन १०५४ [हि.*],
१०४५. हुप.

---

१ पाठीवर कानडींत ರಾಣೇಬೆಂನೂರ ಮೀರದಮೀರ ಅಕುಸಖಾನಗೆ ಮೋ೯
)ಸಿ ಕೊಟದು ರಾಣೇಬೆಂನೂರು व मोडींत 'निा सोद्मीर अंकुसखान' असा
नकूर

-

९

ले. ९ सु. १०४५ } هوالعليل { श १५६७ श्रावण वद्य २
हि. १०५५ जखर १६ } الملك لله { इ. १६४५ जुले ३०

[ मु. आ. लहान वा. शि.* ]

فرمان همایون شرف صدور یافت بعالیت مقدم الامثال
هنمنت کونده دیسائی سمت کوتل معامله بنکاپور آنکه از شهور
سنه خمس و اربعین و الف چون سمت هرگلی معامله مذکو
ر استقامت مقدم الامثال و الاشباه کینگ نایک برحکم فرمان سابق
روانست اما عاملان شاهزاده عالمیان [ मो. जा.* ] خلل نموده فاصل
شدن نمی دهند هرگاه که سمت مذکور ر استقامت نایک
مشار الیه مرحمت شده باشد عاملان شاهزاده عالمیان [* मो जा ] خلل
نموده فاصل شدن ندادن چه معنی دارد اکنون می باید که
بمجرد وصول فرمان قضا جریان شاهی سمت مذکور خارج
حصار هولل در وجه استقامت نایک مشار الیه برحکم فرمان
سابق مقرر و مرحمت دانسته بلا عذر و اهمال فاصل شدن
بدهد و در قبض و تصرف نایک مشار الیه باز گذارد و عاملان
شاهزاده عالمیان [* मो. जा ] را خلل کردن ندهد درین باب تاکید
بلیغ دانسته باز فریاد آمدن ندهد تادانند تحریراً فی التاریخ
١٦ ماه جماد الثانی سنه ١٠٥٥

[सम सात*] پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → हनुमतगौडा देसाई संमत गुत्तल मामले बंकापूर

मामले मजकुरापैकी संमत हडगली पूर्वीच्या फर्मानाप्रमाणें केन्गनायक याजकडे चालूं असतां शाहझादा आलमिया . चे अमलदार अडथळा करून ताब्यांत घेऊं देत नाहींत. समत मजकूर उपर्युक्त नायकास दिली असतां शाहझाद्याच्या अमलदारांनीं अडथळा करून ती ताब्यांत घेऊं देऊं नये याचा अर्थ काय ? आतां हें फर्मान पोहोंचतांच उपर्युक्त संमत ( होन्नलच्या गढीखेरीज ) उपर्युक्त नायकास पूर्वीच्या फर्मानाप्रमाणें

दिली आहे असें समजून ताबा घेऊ द्यावा. शाहिशायाच्या अमल-दारांना अडथळा करूं देऊ नये. या बाबतीत सक्त ताकीद जाणून फिर्याद येऊ देऊ नये ता. १६ जमादिलाखर सन १०५५ [ हि.* ], सु. १०४५.
हुप.

१०

| | | |
|---|---|---|
| शे १० सु. १०४९ | [هوالعلى] | श. १५७० पौष वद्य ८ |
| हि. १०५८ जिल्हेज २२ | الملک لله | इ. १६४८ डिसेंबर २७ |

[ मु आ रहान बा. शि.* ]

فرمان همایون شرف صدور یافت نصاب شعاب مآب شیخ احمد جنیدی سلحدار جمع رکاب نامزد بر تهانداری و دیسائیان قریات رانی بنور حصار رتهلی آنکه از شهور سنه تسع اربعین و الف چون قر[یات] ... ت نواب خان بابا مرحوم که درین وقت بعهد سنجقی خاص حیل حوالم سندی مسند حضور . بود اکنون از راه مراحم پادشاهانه و فرط عواطف خسروانه قریات مذکور در وجه استقامت فرزند ارشد ارجمند کامکار مولد منصور بختیار قره باصرهٔ دولت و اقبال غره ناصیه حشمت و اجلال درة التاج سلطنت کبری' خلف صدق خلافت عظمی مطلع انوار عنایت الهی مهبط انظار عواطف شاهنشاهی طغرا مثال کام بخشی عنوان دیباچه سرور مبدی والا گهر عالی مقدار شاهزاده بلند اقبال سروری آثار [* जा मो] مع کل باب عاطفت فرموده دهانیده شده است می باید که قریات مذکور دخالت نمایند در بعض [*و] تصرف متعلقان سروری آثار موهی الیه باز گذارند تادانند برحکم فرمان اشرف اقدس روند تحریراً فی ۲۲ ماه ذی‌الحجه سنه ۱۰۵۸

[ समाप्त* ] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → ठाणेदारीवर मुद्दाम नेमलेला शेख अहमद जुनैदी शिलेदार आणि देसाई कर्यात राणे बेन्नूर हिसार रट्टेहळ्ळी.

∴ मरहूम नवाब खान बाबां याचे बाबतींतील कर्यात [ मजकूर ], जी सध्यां खासखेलीच्या संचणीसाठीं सीदी सन्बुल...... याच्या हवाला होती ती, आतां मुकासा म्हणून ———————यास दिली आहे. तरी ती हुमाला करून उपर्युक्ताच्या मुतालिकांचे ताब्यांत द्यावी. ता. २२ जिल्हेज सन १०५८ [हि.*], सु. १०४९. हुप.

११

| | | |
|---|---|---|
| शके. ११ सु. १०४९<br>हि. १०५९ मुहर्रम २० | هوالعليل<br>الملك لله | श. १५७० माघ वद्य ६<br>इ. १६४९ जानेवारी २४ |

[ मु. आ. लहान था. शि.* ]

فرمان همایون شرف صدور یافت نصائب عاملان و دیسایان سمت کوتل آنکه از شهور سنه تسع اربعین و الف درین ولا بدرگاه سلیمان بارگاه [ر]وشن گردید که للیا نرال و بعضی نقالان اللدکار رعیت محل دربست کوتهی تلعواه راتب خاصم شریفم مع گاوهای جامر در موضع کلاور سمت کاردگی مرور آمده بودند پتیل موضع کوتال سمت کلدگول با پتیلان موضع اللکی و موضع کمندولی و موضع ترل کهب و سلوی متفق گشته و جمعی کثیر از دردان بهم رسانیده در سر بیرکی نقالان مذکور تاحدم چند کس نقالان و محل دار را زخمی ساخته چهار تکه جامر و یک کنتهالی زر برده و قتل ازین سر تک جامر نادمه سدپا شانادی دردیده بود جمله هفت تکه و یک کنتهالی از دردمی برده ازین ممر بقالان محل مذکور رنجیده ترک کسب و کار خود نموده و در عمل حاصل محل مذکور تعلل یافته است هرگاه که نقالان محل مذکور مع گاوهای زتار و نیر تار از ولایت قلمرو آمد و رفت و خرید و فروخت نموده حاصل می داده باشند چه قدرت و مجال پتیل موضع کوتال مذکور است که بیداوه و راهزنی و دزدی نماید اکنون می باید که بمجرد وصول فرمان قضا جریان شاهی از تهانه احشام فرستاده پتیل موضع کوتال مذکور را بدست آورده هر قدر تهالی جامر و زر وغیره از نقالان مذکور و بعضی برده باشد

تمام و کمال ذره ذره حاکم ساخته بدرگاه معلی برسانند و اورا چنان گوشمال و تادیب نمایند که می بعد ترک پنداره و دزدی و راهزنی نموده بحال خود باشد درین باب تاکید بلیغ و قدغن عظیم لازم دانسته حسب الحکم جهان مطاع عالم مطیع بعمل آورند تا دارند تحریراً فی ۲۰ شهر محرم الحرام سنه ۱۰۵۹

پروانگی حضور پر نور اشرف اقدس همایون اعلی ۱[समाप्त*]

[सारांश*]

मुहम्मद आदिलशाह → अमलदार व देसाई समत गुत्तल

याविषीं दरबारास समजलें कीं, हलप्पा बराल व अल्लद्‌चे इतर बक्काल–कोठीखात्याकडील व खासे नोकर–हे कापडाचे बैल घेऊन कलगूर समत कारडगी येथें मुक्कामास आले होते तेव्हां, मौजे कोयवाल समत कुद-गोळ येथील पाटलानें मौजे अक्लगी, कमडोळी, तरलखव, सन्वी (सवसी) या गावचे पाटील व पुष्कळ चोर यांस बरोबर घेऊन, बक्कालांवर झडप घालून आणि बक्काल व महलदार यांचे कांहीं लोक जखमी करून कप ड्याचे चार नग व सोन्याची एक कठाळी लांबविली यापूर्वी सिद्‌प्पा शावाद्री (शाबाद्री ?) याचे कापडाचे तीन नग चोरले होते एकूण सात नग व एक कठाळी चोरून नेली या योगें वरील खात्याचे बक्काल रंजीस येऊन व स्वत चा कामधदा सोडून स्वस्थ बसले आहेत आणि वरील खात्याच्या वसूलाबाबत अडथळा आला आहे वरील खात्यातील बक्काल रिते व भरलेले बैल घेऊन कलमरू भागाशीं येजा व खरेदीविक्री करून वसूल देत असल्या-मुळें मौजे कोयवालच्या पाटलास पुढावा, वाटमारी व चोरी करण्याची काय ताकत व मजाल आहे आता हें फर्मान पावताच ठाण्याहून हशम पाठवून वरील पाटलास दस्त करावें आणि बक्काल व इतर यांचे कापडाचे नग व द्रव्य वगैरे जें पळविलें असेल तें सर्वच्या सर्व हस्तगत करून दरबाराकडे पाठवून द्यावें तसेंच त्यास अशी तंबी द्यावी कीं, पुढावा, वाटमारी व चोरी सोडून देऊन तो नीट राहील या बाबतींत सक्त ताकीद जाणून फर्मानाप्रमाणें अमल करावा ता २० मोहरम सन १०५९ [हि*], सु १०४९. हप

• १ पाठीवर कानडींत ಕಂಮಿಜಾಲ ... ಗೊಂಡ್ಯಾಲು व मोडींत ' फर्मान सा गुतल ' असे शेरे

१२

ले. १२ सु. १०४९ } हि. १०५९ सफर २७ }   هوالخليل الملک لله   { श. १५७० फाल्गुन वद १४ { इ. १६४९ मार्च २

[मु. आ. मोठा वा. शि.*]

فرمان همایون شرف صدور یافت بجانب مقدم الامثال هنمنت گوند، گرتل آنکه از شهور سنه تسع اربعین و الف درین ولا حکم جهان مطاع آفتاب ارتفاع نافذ گشته که آن مقدم الامثال معه جمعیت و احشام جهت مصاحب پادشاهی لشکر ظفر پیکر نزد ایالت و امارت پناه ابهت و شوکت دستگاه حکومت و معالی جاه اعتضاد خلافت از فرمان روای اعتماد سلطنه و کشور کشای فص خاتم شجاعت و بختیاری آب گوهر شهامت و جانسپاری سیف مسلول بازوی شاهنشاهی رمح مصقول معرکه دشمن کاهی مقدمه الجیش معارک ملک گیری ........ پیش آهنگ مصاف فیروزی و کامرانی طراز آستین ابهت و اجلال گوهر سریر دولت و اقبال مخزن اسرار خلیفه الهی مجموعه هوشمندی و کارآگهی [ مونس ] وحدت سرای حضور محرم خاص الخاص سریر سرور مطرح انظار عنایت مورد الطاف قدسی سرایت انس مجلس وحدت [ جلیس محفل خلوت ] عالیشان رفیع مکان خلاصه امرا منیع الشان زبدهٔ خوانین رمین و رمان سعادتمند ازل و ابد مدارالدین خان محمد وزیر حکومت برود باید که بوصول فرمان... عظیم الشان آن مقدم الامثال حسب الحکم اشرف پیش حکومت پناه معزالیه رفته کمر بندیت درمیان جان بسته آثار حلال نمکی درگاه معلی بظهور رساند که درضمن آن سرافرازی او است درین باب قدغن عظیم لازم شناسد تا داند تحریراً فی ۲۷ شهر صفر سنه ۱۰۵۹*

* पाटीवर कानडींत ಜಂದಿಗೆ ಮಸಲತಿಗೆ ಹೋಗುವದೆ ಫರ್ಮಾನ असा शेरा.

. [ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → हनुमंतगौडा गुत्तल

या वेळीं हुकूम सुटत आहे कीं, त्यानें आपली जमेत व हशम घेऊन पादशाही मसलतीसाठीं लश्करासह मुबारिझुद्दीन खान मुहम्मद–वझीर हुकूमत–याजपाशीं जावें. तरी हें फर्मान पोहोंचतांच त्यानें हुकुमाप्रमाणें उपर्युक्त हुकूमत–पनाहाच्या पुढें जाऊन व जीवादारम्य चाकरीची हिमत धरून दरगाहाच्या कृतज्ञतेच्या चिन्हांचें आविष्करण करावें. यांत त्याचें ऊर्जित आहे. या बाबतींत सक्त ताकीद जाणावी. ता. २७ सफर सन १०५९ [ हि.* ], सु. १०४९. हुप.

१३

| | | |
|---|---|---|
| ले १३ सु. १०४९<br>हि. १०५९ जवल २ | هوالجليل<br>الملک لله | श. १५७१ ज्येष्ठ शुद्ध ४<br>इ. १६४९ मे ५ |

دربرنگین شد هفت اقلیم شاه دین محمد ابراهیم [वर्तुळात*]
فرمان همایون شرف صدور یافت بعاملان و دیسایان
سمت کرور معامله بنکاپور آنکه از شهور سنه تسع اربعین و الف
چون زرتعهد تعلق مراث های و بعضی بابت گوویند نایک و تمامی
نایک مبلغ چهارهزار هون وصول دو ساله جهت سنه المذکور
دو هزار هون و سنه خمسین الف دو هزار هون مقرر نموده
دروجه تنخواه راتب حاضر شریف روانست دران مراث مهمکی
پیت ابراهیم پور سمت مذکور که بولیا دیسای معامله مذکور
میکند آنرا تعهد یک صد هشتاد پنج هون وصول دو ساله جهت
سنه المذکور هشتاد و هفت هون و نیم و سنه خمسین الف
هشتاد و هفت هون نیم مقرر فرموده شده است می باید که
زر مذکور بوصول رسانیده بمحل راتب مرسول دارند و اگر
در دادن حرکت و عذر پیش آرند حق لوازم و انعام و بعضی
اماکن نموده سرانعام کرده بنوسند تا دانند حسب الحکم جهانمطاع
عالم مطیع بعمل آورند تحریراً فی تاریخ ۲ ماه جمادی الاول
سنه ۱۰۵۹

پروانگی حضور پرنور اشرف اقدس همایون اعلی

[मोर्तब*] रणधीर रणेछूची हनुमंतगौडा सन १०५९ सर्वधारी संवछर शेके १५७१

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → अमलदार व देसाई समत केरूर मामले बंकापूर

गोविंद नायक व तिमाजी नायक यांच्या बाबतींतील व मिरासी संबंधींच्या नजराण्याचा दोन सालांतील चार हजार होन वसूल–प्रस्तुत सालचा दोन हजार व सन १०५० सालचा दोन हजार–कायम करून खाशाच्या रातिबाचा तनखा म्हणून चालूं आहे. वरील समतेमधील इब्राहीमपूर पेठेच्या महाजनकी–ही वरील मामल्याचा देसाई बुळप्पा करीत आहे–बद्दल दोन सालांत–प्रस्तुत सालीं ८७॥ होन व १०५० सालीं ८७॥ होन–मिळून १७५ होन नजराणा कायम केला आहे. हा पैसा वसूल करून रातिब खात्याकडे धाडून देण्याचें करावें. जर पैसा देण्यास हरकत करतील तर हकलवाजिमे, इनाम व इतर अमानत करून व व्यवस्थेनें त्यांस पाठवून द्यावें. ता. २ जमादिलावल सन १०५९ [हि.*], सु. १०४९. हुप.

१४

| | | |
|---|---|---|
| ले. १४ सु. १०४९<br>हि. १०५९ शाबान १२ | هوالملك<br>الملك لله | श. १५७१ श्रावण शुद्ध १५<br>इ. १६५९ आगस्ट १२ |

[ मु. आ. मोडी शा. शि. * ]

دری ماحم

درمان همایون شرف صدور یافت نعاف هلملی گونده دیسائی سمت گوتل آنکه از شهور سلم تسع اربعین و الف چون سمت کرور معه پیش معاملم بنکاپور مایحتاج محل علیا هناب عصمت مآب پرده نشین تتق (تتق ؟) عزت سپهر (شهر ؟) یاری حعلم گزین سرادقات حشمت و کامگاری بلقیس الزمان خدیعه الدوران طهارت پناهی حداوت دستگاهی ناموس العالمین مشهور العاعلن ... دامت عصمتها و عفتها الی یوم الدین روانست درین ولا بدرگاه معلی نارگاه روشن گردید که ملور لکهم ؟ و ساینا منجی و بهریا کرل و چنیا گونده گلنگوپ این چهار نفر از روی متمردی بدیهای سمت مذکور تسویش و ازار رسانیده، کا و

کورو برده‌اند چه حد و اندازه آنها باشد و او دنبالی شده
متمردان مذکور را گوشمال نداده خاموش می باشی چه معنی
دارد اکنون می باید که بمجرد وصول فرمان قضا جریان
شاهی متمردان مذکور را بادب واقعی نموده از دهای
سمت مذکور آنچه گاو کورو برده اند تمام در حال رها
گردانیده بدهانند و بیشتر آنها را چنان تنبیه و تاکید نماید
که مجال دهای سمت مذکور بهیچ وجه من الوجوه مزاحم
نرسانیده اهل خود باشد و رفع شورش آنها شده ولایت
سمت مذکور معمور گشته دست سال بسال زیاده دستر پی در
پی رسد می آمده باشد تا دولت خواهی او ظاهر شود باس
معنی سعی و .. درین . سرافرازی او است باداند حسب الفرموده
اشرف اقدس همایون اعلی عمل آورد تحریراً فی تاریخ ۱۳
شهر [ شعبا]ن المعظم سنه ۱۰۵۹

[समाप्त*] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس
همایون اعلی

मुहम्मद आदिलशाह → हनुमतगौडा देसाई समत गुत्तल

मामले बकापूरपैकीं पेठेमह करूर समत वही साहिबाच्या ताब्यात चालू आहे सध्या दरगाहास समजलें कीं, मल्लूर लसप्पा (मा ?), सावनिया मन्ची, भरपा करल, चीनागौडा गनीकोप हे चार जण बद्दाच्या रूपानें या समतेंतील गावास तशवीश देऊन गुरेंढोरें घेऊन गेले आहेत. त्याचें केवढें हें धाष्ट्य आणि त्यानें देसाई होऊन वडखोराना शासन न देता स्वस्थ असावें ह्याचा अर्थ काय ? आता हें फर्मान पोहोंचताच बडखोरास योग्य सजा देऊन ते जीं गुरेंढोरें घेऊन गेले असतील तीं सर्व तावडतोब सोडवावीं आणि पुढें त्याना अशी तबी यावी कीं ते वरील समतेमधील गावात कोण तीही ढवळाढवळ न करता आपल्या मर्यादेंत राहतील आणि वरील समतेस त्यापासून होणारा त्रास चुकून ती आबाद व्हावी तसेंच हळूहळू सालो-

---

१ पाठीवर कानडीत ಚಿಕ ಕೆರೆಜುರ ವಿಲಾತಿಗೆ ತಸು [ವ] ಸು ಕೊ ಡುಧಾರೆಂಬದಕೆ . ಉರ ಉಧಲಿ ಗುಡುಗಿನ ಕೊ . ..ವರಿ ಗೋಲ್ಕಾಲ ಕೊಡಿಯುಂದು ಬರಸಿದೆವೆ असा व मोडींत 'निा बड साहेबा' असा मजकूर.

साल वाढता दस्त मिळावा. म्हणजे त्याची राज्याविषयींची सदिच्छा व्यक्त होईल. या दृष्टीनें प्रयत्न करावा यात त्याचें अतिशय ऊर्जित आहे फर्मानाप्रमाणें अमल करावा. ता १३ शाबान सन १०५९ [हि *], सु. १०४९. हुप

| | | |
|---|---|---|
| ले. १५ सु १०५२<br>हि १०६२ सफर २६ | १५ | श १५७३ माघ वद्य १२<br>इ १६५२ जानेवारी २८ |

بسم الله الرحمان الرحیم

الملک لله

[मु आ. मोठा वा शि *]

فرمان همایون شرف صدور یافت بجانب مقدم الامثال هنمنت گونده دیسائی کردل انکه از شهور سنه اثنی خمسین و الف درین ولا بدرگاه والا جاه روشن گردید که بعد از وفات خان گونده دیسائی پرگنه لکهمسر کنچی گونده نام برادرش شیوه حرام خواری بظهور آورده در موضع سرهتی پرگنه مذکور مانده انواع تمردی و فتنه انگیزی می کند بنابران برای دفع و گوشمال او از حضور فایض النور بر شجاعت مآب خان سعادت نشان ابراهیم موسی خان با سپاه نامزد پرگنه مذکور فرموده شده است می باید که آن مقدم الامثال بمجرد وصول فرمان قضا جریان شاهی معه جمعیت و احشام خود باستواری تمام مهیا گشته فی الحال به پرگنه مذکور رفته برفاقت و استصواب خان موصی الیه در و حر (دخیره؟) و هلاک متمرد مذکور وظایف(؟) جانفشانی و حلال نمکی درگاه آسمان جاه بتقدیم رسانند، بنحوی باید ساخت که لحظه و لمحه درنگ و اهمال نورزند تا مورد سرافرازی او گردند درین باب تاکید بلیغ بدعن عظم (عظیم؟) لازم شناسند تادانند بر حکم فرمان اشرف اقدس جهان مطاع عالم مطیع رود تحریراً فی التاریخ بیست ششم شهر صفرالمظفر سنه ۱۰۶۲

د

[समासांत*] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی[१]

[ फार्सी मजकुराखाली कानडीत* ]

ಫರ್ಮಾನ ಹುಮಾಯುನ ಶರಫ ಸದುರ ಯಾಫ್ತ ಬಜಾನಿಬ ಮೊಕದಮು ಮಿಮಸಾಲ ಗುತಳದ ಹಣಮಂತ ಗೊಂಡಗೆ ಬಯಿನಾಯಾತೆ ಬಿಗಾಯಾತ ಶಾಹಾನಾ ಉಂಕಿ ಆಜ ಸುಹುರ ಸನ ಯಿಸದೆ ಬಿಮಸನ ವ ಅಲಫ ಸಾಂಪ್ರತ ದರಗಾಹಕೆ ಆ ಕ್ಕೈಯಾದ ವಿವರ ಪರಗಣೆ ಲಕ್ಷ್ಮೆಶ್ವರದ ದೆಸಾಯಿ ಖಾನ ಗೊಂಡನು ಬಲಾದುರ ಆದಮೆಲೆ ಅವನ ತಂಮ ಕಂಚಗೊಂಡನು ಹರಾಮ ಖೊರಿ ಪ್ರಕಟ ಮಾಡಿ ಮನ್ವಜೆ ಸಿರಹಟ್ಟಿ ಪರಗಣೆ ಮಜಕೂರನಲಿ ಯಿದ್ದು ಮುತಮರ್ದಿ ಮಾಡುತ ಯಿಧ್ಹಾನೆ ಆದಕೆ ಅವನ ನಿರ್ಮೂಲ ಮಾಡೊ ವಿಶಿವಾಗಿ ಹುಜರದಿಂದ ಸುಜಾಅತಮಾಬ ಖಾನ ಸಾದತನಿಶಾನ ಯಿಬರಾಹಿಮ ಮುಸೆಖಾ ನರಿಗೆ ಕುದುರಿಮಂದಿಸಹಿತ ಪರಗಣೆ ಮಜಕುರಿಗೆ ನಾಮುಜದಿ ಮಾಡಿ ಅದೆ ಆದಕೆ ನಿನು ಫರ್ಮಾನ ಕಂಡಾಕ್ಷಣವೆ ಕುದುರಿಮಂದಿಸಹಿತ ರವಾನೆ ಆಗಿ ಖಾನ ಮೊಮಿನಿಲೆರ ವಿದ್ಯಮಾನದಿಂದ ಹರಾಮಖೊರಗೆ ಬುಫಗಳಿಸುವರ ವಿಶದಲಿ ನಿಂಮ ದೌಲತಖೊಹಿ ಪ್ರಕಟ ಮಾಡಿ ಅವನ ನಿರ್ಮೂಲ ಮಾಡುವದು ಯಿ ವಿಶದಲು ಆಲಶ್ಯ ಮಾಡಲಾಗದು ಯಿದರಿಂದ ನಿಂನ ಸರಫರಾಜಿ ಆದೆ ಯಿ ವಿಶೆದಲಿ ಬಹು ತಾಕಿದಿ ಯೆಂದು ತಿಳುವದು ಶಾದಾಸಂದ ಫರ್ಮಾನದಂತೆ ವರ್ತಿಸುವದು ಚಂದ್ರ ೨೬ ಮಾಹೆ ಸಫರ ಸನ ೧೦೬೨ ಪರವಾನಿಗಿ ಹುಜುರ ಖುರಶಿದ ಜಹುರ ಅಶರಫ ಅಕದಸ ಹುಮಾಯುನ ಅಲಾ

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → हनुमंतगौडा देसाई गुत्तल

सध्यां दरगाहास समजलें कीं, लक्ष्मेश्वर परगण्याचा देसाई खानगौडा मरण पावल्यावर त्याचा भाऊ कंचनगौडा हरामखोरीचा धंदा प्रकट करून परगणे मजकूरपैकीं मौजे शिरहट्टी येथें राहून तऱ्हतऱ्हेनें बंडखोरी करीत आहे. त्यास दफे व शिक्षा करण्यासाठीं हुजूरकडून इब्राहीम मुसाखान यास शिपायांसह वरील परगण्यावर खास नेमिलें आहे. तरी हें फर्मान मिळतांच त्यानें आपली जमेत व प्यादे घेऊन सर्व गोष्टींनीं तयार होऊन वरील परगण्यांत जावें आणि उपर्युक्त खानाच्या सल्लचानें व संगतीनें बंडखोरास मारून एकनिष्ठेत प्रगति करावी. त्यास नेस्त नाबूद करावें. क्षणाचा उशीर करूं नये. म्हणजे त्याचें जास्त ऊर्जित होईल. या बाबतींत सक्त ताकीद जाणावी. फर्मानाप्रमाणें चालावें. ता. २६ सफर सन १०६२ [हि. *], सु. १०५२. हुप.

---

१ पाठावर मोडींत 'पौ छ १२ रबिलवल' व 'निा फतेखान सरसर नौबत' असे शेरे

ले. १६ सु. १०५५ } १६ { श. १५७६ पौष शुद्ध ६
हिं. १०६५ रबल ४ } { इ. १६५५ जानेवारी ३

بسم الله الرحمان الرحیم

الملک لله

[ शिक्कयाचे* वाचतांत ले. १३ प्रमाणें * ]

فرمان همایون شرف صدور یافت بجانب هنمنت گوندہ دیسائی سمت گوتل معاملہ بنکاپور آنکہ از شہور سنہ خمس خمسین و الف دربن ولا عزت و رفعت دستگاہ حشمت و شوکت انتباہ شجاعت و شہامت پناہ معتمد درگاہ سلطانی معتبر بارگاہ خاقانی ملک عالی شان رفیع القدر و المکان ملک الامرای ملک ریحانرا جہت تنبیہ و تادیب جترکل کار نانکار نامزد فرمودہ شدہ است می باید کہ بمجرد وصول فرمان قضا جریان شاہی احشام خود و بعضی استعداد قلعہ گری (گیری) برای کمک ملک الامرای معزالیہ فرستادہ حرام خوار مذکور را گوشمال رسانیدہ دولتخواہی خود ظاہر نماید در این معنی باعث معرای نیکو بندگی و بیشتر سرافرازی خود شناسد تادانند برحکم فرمان اشرف عمل نماید تحریراً فی التاریخ چہارم ماہ ربیع الاول سنہ ۱۰۶۵

پروانگی حضور خورشید ظہور اشرف اقدس همایون اعلی

[ मोर्तब* ] हणमंतगौडा रणधीर रणेसूची सन १०६५ मनंमथ संवछर शेके १५७७

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → हनुमंतगौडा देसाई समत गुत्तल मामले बंकापूर

सांप्रत मलिक रेहानला चित्रकलकारांना तंबी देण्यासाठीं मुद्दाम नेमिलें आहे. तरी हें फर्मान पोहोचतांच स्वतःचे पायलोक व किल्ले घेण्याचे इतर सामान उपर्युक्त मलिकाच्या कुमकेसाठीं पाठवावें आणि वरील हरामखोरास शिक्षा करून राजनिष्ठा व्यक्त करावी. या योगें पुढें आपलें ऊर्जित होईल

असें जाणावें. फर्मानाप्रमाणें आचरण करावें. ता. ४ रबिलावल सन १०६५ [ हि.*], सु. १०५५. हुप.

ले. १७ स.
हि.　　} १७ الر...... { श. इ.

[ मु. आ. वा. मोठा शि * ]

فرمان همایون شرف صدور یافت[1] ........
و نوازش و التفات خسروانه ممتا[ز] ........
در معامله محمدنگر وفات رس[ید]......
خسروانه نایکی معامله مذکور و ......
مع خلعت فاخره حهتم او فرستاد[ه] ......
و هیم غم و الم پدر خود پیرامون خاطر گردید ......
در فدویت و جانسپاری درگا[ه]......
فدویت و نیکوبندگی درگاه نهایت العایت ظهور ......
پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی[2] [ *समाप्त ]

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → .......

......... मुहम्मदनगर मामल्यामध्यें मरण पावला ....... मामले मजकूरची नायकी ......... पोशाखासह त्याजसाठीं पाठविली आहे. ......आपल्या पित्याविषयींचें दुःख मनांत न आणितां दरबारची चाकरी व आत्मार्पण ... दरबारच्या सत्सेवकाचें कर्तव्य खूप खूप व्यक्त करावें. हुप.

---

१ या फर्मानाचा डाव्या अंगचा अर्धा भाग नाहींसा झाला असल्यानें यांतील वृत्तांत जागोजाग तुटला आहे. यावर मुहम्मद आदिलशाहाचा शिक्का असल्यानें हें निदान त्याच्या कारकिर्दीचे शेवटीं निघालें असेल असें समजण्यास हरकत नाहीं. याच कल्पनेनें हें फर्मान येथें मुहम्मदच्या फर्मानांचे अखेरीस घातलें आहे.

२ पाठीवर कानडींत ದಿ೦೭೦೭ ವಜಿಂ ಮೊಕದರ ಫಿರಮಾನ ದಾ ಸರನಾ ಯಿತೆ ಯಿಕೆಂ असा शेरा

ले १८
हि. १०६७ रबल २९

१८

श १५७८ माघ शुद्ध १
इ १६५७ जानेवारी ५

بسم الله الرحمان الرحیم

الملک لله

[ना शि *]

فرمان همایون شرف صدور یافت اکرم مقدم الامثال همت
گوینده کوبل بعنایت بعنایت شاهانه امیدوار بوده بدانند که
درین ولا بدرگاه جهان پناه روشن گردید که سدوا حرام خوار از
کم طالع بر جاده اطاعت فرمان برداری بند(ن)رگاه فلک جاه پا بیرون
نهاده (نهاده) بولایت پادشاهی مزاحمت رسانده دست دراز نموده
است لهذا بصحبت مندمع ساحت حرام خورمذکور بور حدنقر دولت
و بندداری بوباوه باعسان حشمت برخورداری سعادت مند
اقبال همراه دولت خواه زاده درگاه جهان پناه لایق الرتبت و الاحسان
ارجمند دانشمند مکان محمد اخلاص خان فرزند رشید ایالت و امارت
پناه ابهت و شوکت دستگاه حکومت و معالی جاه اعتضاد خلافت
و فرمان برداری اعتماد سلطنت و کشور کشای فتح خاتم شجاعت
و بندداری آب گوهر شهامت و جانسپاری سدت مسئول بازوی
شهنشاهی رمح مصقول معرکه دشمن کاهی مقدمه العیش .
و جهان ستانی پیش اهنگ مصاف فیروزی و کامروایی طراز
آستین ابهت و اجلال گوهر سوبر دولت و اقبال مخزن اسرار
علم الهی مجموع هوشمندی و کار اگاهی مونس (سس) وحدت
سرای حضور محرم خاص الخاص سریر سرور مطرح انظار عنایت
مورد الطاف قدسی سرادق انس مجلس وحدت مجلس محفل
خلوت عالیشان رفیع ( رفیع ) مکان ( مکان ) خلاصه امرای منیع الشان
زبده خواتین زمن و زمان سعادت مند ازل و ابد مدار راازدس
فرزندی خان محمد وزیر حکومت را مورد داری کرناتک تعین
نموده باوزرای عظام فرستاده شده بود بمصور آن طرف مامور
با مردم خود ازمرد مان سدوا باکردار بسی جنگ [*و] جدل مشقت
نموده بانهان شکست(ت) داده در دولت خواهی و نیکوبندگی

درگاه تعالی العالی می کوشد بنابران از راه مراحم بادشاهانه [*و]
مرحمت و عواطف خسروانه موضع لنگدهلی باراوده (؟) رفعت دستگاه
وزارت مآب اعظم خان دور نموده موضع کوتهی هال هر دو
دو حصار رتهلی در وجه انعام ابدی و اکرام سرمدی (مدی)
بآن دولتخواه درگاه داخل محصول و نقدیات و بعضی وجوهات
کل باب داده شده است می باید که دیها مذکور در نص
تصرف آورده باولاد و احفاد بعد خود انعام دانسته و در
دولتخواهی و بندگی درگاه عرش اشتباه بکوشد درین
باعث سرافرازی اوست باداسد برحکم فرمان همایون روند
تحریر[*تر]را فی التاریخ (مع) ۲۹ شهر ربیع الاول سنه ۱۰۶۷

بروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس [ समासात* ]
همایون اعلی[1]

[ सारांश* ]

२ रा अली आदिलशाह → हनुमतगौडा गुत्तल

सध्या दरबारच्या ध्यानास आलें कीं, हरामखोर सीवा यानें निष्ठेंतून पाय बाहेर टाकून पादशाही विलायतींत अडथळा उत्पन्न करून पाय पसरले आहेत त्या हरामखोरास दफे करण्यासाठीं मुहम्मद इस्लामखान-मुबारिझुद्दीन खान मुहम्मद वझीरे हुकूमत याचा मुलगा-यास कर्नाटकची सुभेदारी देऊन व उत्तम वजीरांसह पाठविलें होतें तेव्हा त्यानें त्याच्या समक्ष मासूर तर्फेत आपल्या लोकांसह सीवाच्या लोकांशीं खूप लढाई करून त्यास शिकस्त दिली व राज्याच्या सदिच्छेविषयीं खूप खूप प्रयत्न करीत आहे म्हणून लिंगदहळ्ळी [ . ]-अअजमखानाकडून दूर करून-व मौजे कोटीहाळ हे दोन गाव-रट्टेहळ्ळी गढी पैका (किंवा सह ?)-त्या दौलतखोहास निरनिराळ्या बाबींसह इनाम दिले आहेत तरी हे दोन गाव ताऱ्यांत घेऊन वशपरपरेनें इनाम आहेत असें समजावें आणि राज्याच्या कल्याणासाठीं झटावें यात त्याचें ऊर्जित आहे फर्मानाप्रमाणें चालावें ता २९ रबिलावल सन १०६७ [ हि * ] हप

---

१ पाठीवर कानडींत ಲಿಂಗದಹಳ್ಳಿ ಕೊಟ್ಟಿಹಾಳ ಯಿನಾಮತ್ತಿ ಫರ್ಮಾನಸು मोडींत 'सन १०६७' असे शेरे

ले. १९ सु. १०५७ } १९ { श. १५७८ माघ वद्य ६
हि. १०६७ रबर १९ } { इ. १६५७ जानेवारी २५

بسم الله الرحمان الرحيم

الملک لله

مهر باد علي

فرمان همایون شرف صدور یافت بجانب هنمنت گونده دیسای
سمت گوتل معامله بنکاپور آنکه از شهور سنه سبع خمسین و الف
امر اشرف نافذ گشته که او قدیم دولتخواه نمک‌پرورده
درگاه جهان پناه است و وقت خدمت است در رسیدن فرمان
قضا جریان شاهی در حال مع احشام نزودی روانه بحضور
وافر ا[*ل]سرور خود را برساند که درین ضمن باعث سرافرازی
[*و؟] مجرای خدمت است و هرچه خرج احشام باشد بعد از آمدن
حضور بلا قصور رسانده خواهد شد و آنچه احشام موجود باشد
آنرا همراه خود دارد و متعلقان خود را نیز تاکید کند که بمشتلر
هر قدر احشام بهم رسد این همه‌را (را) نیز میفرستاده باشد و لوازم
مدارگذاری و حلال‌نمکی است که بوقت خدمت حاضر باید
شد تا داند بحکم فرمان اشرف روند تحریراً فی تاریخ ۱۹ ماه
ربیع الثانی سنه ۱۰۶۷

پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی

[ मोडींत* ] हणमंतगौडा रणेधीर रणेसूचीं सन १०६७ हेविलंबि संवउर शेके १५७९

[ सारांश* ]

२ रा अली आदिलशाह → हनुमंतगौडा देसाई समत गुत्तल मामले बंकापूर.

तो जुना राजनिष्ठ व हुजूरकडून वर्धित असा आहे. ही चाकरीची वेळ आहे. हा फर्मान मिळतांच स्वतः तातडतोब पायलोकांसह जलदीनें हुजूर यावें. यांत उत्कर्षाचें कारण आहे. पायलोकांचा खर्च येईल तो येथें आल्यावर कसूर न होतां पावता होईल. तयार असतील ते

पावटोक आपल्याबरोबर आणावें आणि आपल्या मुतालिकांना ताकीद करावी की, त्यांनें जे पावटोक येतील त्यांनाही पाठवून द्यावें. निमक-हलालीनें व एकनिष्ठानें कर्तव्य आहे की, भावीच्या प्रसंगी हजर व्हावें. फर्मानाप्रमाणें आचरण करावें. ता. १९ रबिलाखर सन १०६७ [ हि.* ], सु. १०५७. शुय.

के. २० सु. १०६० } २० { श. १५८१—८२ / इ. १६५९—६०

بسم الله الرحمن الرحيم
الملک لله

[ २ ऱ्या अ. आ. चा. शि.* ]

فرمان همایون شرف صدور یافت[1] ......
از شهور سنه ستین و الف دربی ولا ... ..
خود را بسرعت هرچه تمامی (م ۲) در ساطوسی ......
و اورا خطاب منصب کرنده عنایت ......
سرافتخار بر بلندی آسمان رسانده ......
برحکم فرمان اشرف رود ......

[ समासात* ] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی[2]

[ सारांश* ]

२ रा अली आदिलशाह → .....

सध्यां......शक्य तितक्या जल्दीनें हुजूरच्या दर्शनास......त्यास हनुमंतगौडा हा खिताब......स्वतःच्या उत्कर्ष समजून ...फर्मानाप्रमाणें अमल करावा. सु. १०६० शुय

१ या फर्मानाचा डाव्या बाजूचा अर्धा भाग फाटून गेला असल्यामुळें प्रत्येक ओळ अर्धवटच उपलब्ध होत आहे यामुळें अर्थ करण्यांतही जागोजाग व्यत्यय आला आहे.

२ पाठीवर कानडींत ... ಶ್ರೀ ಹನುಮಂತ ಗೌಡನ ಅಸಾ शेरा.

ले. २१ सु. १०६१ }  २१  { श. १५८३ ज्येष्ठ शुद्ध ६
हि. १०७१ शव्वाल ५ }  { इ. १६६१ मे २४

بسم الله الرحمان الرحیم

پادشاه علی عدل شا...

نقل

فرمان مهر [ *मो. जा ] از قرار تاریخ ۵ ماه شوال سنه ۱۰۷۱ آنکه فرمان همایون شرف صدور یافت بجانب عاملان و دیسائیان سمت هرکلی معامله سکاپور آنکه از شهور سن (سنه) احدی ستین و الف درین ولا حاجب از حکم هلوپ گوندا دیسای سمت گوتل و معاملات هاء بدرگاه خلایق پناه التماس نمود که موضع هولل سمت مذکور بر سرحد است آنجا همیشه سلسله عنیمان است ازین واسطه در دیه مذکور پنجاه نفر احشام نهاده سمت مذکور و ولایت نگاه داشته می باشند [ *در] موضع مذکور آنچه که دست می شود آن تمام به شکم احشام رسانده به سرحد از هوشیاری استاده اند نظر کمیااثر ارزانی فرموده موضع مذکور برای استعداد احشام عاطف ساخته فرمان اشرف جهت مرحمت فرمودن (مایند) بنابران التماس حاجب دیسای مشارالیه بخاطر مبارک اعلا (اعلی) آورده موضع هولل بعد مز [ *ر] عرهای سمت هرکلی مذکور به هلوپ گوندا مشارالیه انعام مرحمت ساخته دیه مذکور کل باب و کل وجوهات برقانونات دسالیه نموده است به اولا [ د و] احفاد روان دارند و هر سال عذر فرمان نکند برحکم فرمان اشرف رود

بروانگی حضور حوا[ رشد طهور اشرف اقدس [समाप्त*] همایون ] اعلا[१]

---

१ पाठीवर कानडीत ...... ಫರ್ಮಾನದ ತ್ರಾಲಿಕು ಫರಮಾನದ ಗಂಟಿನೊಳಗೆ ಬಿದ್ದುಹೋಗಿದು असा लेख.

[ मासिक* ]

२ रा अली आदिलशाह → अमलदार व देसाई समत हुकेरी मामले मकापूर.

मध्यी हनुमंतगौडा देसाई समत गुलज व [ इतर* ] महाल याचे हेजिबानें दरगाहास विनंति केली की, उपर्युक्त समतेंतील होळल गांव सरहद्दीवर आहे. तेथें नेहमीं शत्रूशी प्रसंग असतो. म्हणून वरील गांवीं पन्नास इसम ठेवून वरील समत व विलायत यांचें रक्षण करीत आहे या गांवापासून जातीं लागतें तें इसमांच्या पोटास दिल्यानें ते सरहद्दीवर हुशारीनें असतात. तरी कृपादृष्टीनें वरील गांव इसमांच्या तयारीसाठीं इनाम मिळावें व तसें फर्मान व्हावें. हेजिबाची विनंति ध्यानांत घेऊन हुकेरी समतेपैकीं होळल हा गांव–बादशाहा–हनुमंतगौडा यास इनाम दिला आहे वंशपरंपरेनें चालूं ठेवावा. ता. ५ शव्वाल सन १०७१ [हि.*], सु १०६१. हुप

हे २२<br>हि. १०७४ रमजान ८ }. २२ { श. १५८६ चैत्र शुद्ध ११<br>इ १६६४ मार्च २७

بسم الله الرحمان [الرحیم]

الملک لله

[ २ ऱ्या अ आ. शा हि * ]

فرمان همایون شرف صدور یافت آنکه وزارت مآب عمدت
گواه بعنایات بیغایات شاهانه سرافراز و امید[وا]ر بوده
بداند که چون عزت و رفعت دستگاه شجاعت و شهامت
سیادت و نجابت انتباه سوار میدان جلادت سوار ساعد بسالت
عمدة الاعیان زبدة الامرا خان عالیشان بلند مکان شرزه
خان را طرف معامله بورکل و ملتان مامور فرموده فرستاده
شده است می باید که آن دولت‌خواه با جمعیت و احشام
خود نزد خان موصی الیه رسیده خدمت بشکوهی و جانفشانی
درگاه والا جاه بظهور آرد و اگر درین باب درنگ و اهمال

ورره يقين شناسد كه اورا تاكيد بواجبي خواهد شد تادانند
تحريراً في التاريخ هشتم شهر رمضان المبارك سنه ۱۰۷۴

[ समाप्त* ] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس
همایون اعلی[1]

[ मोर्तब* ]

फर्मान हुमायून शरफ सदूर याफ्त ऊकी वजारतमाब हणमतगौडा बइनायात बेगायात शाहाना सरफराज वा उमेदवार बूद: बिदानद के चू इजत वा रफाअत दस्तगाह शुजाअत वा शाहमत पनाह सियादत वा निकाबत इतिबाह सुवार मैदान जलादत सिवार साअद बसालत उमद:तुल आयान जुबदे:तुल अकरान खान आलीशान बुलंदमकान शर्जेखानासी तरफ मामले तोरगल वा मलनाड नामजद फर्माविले असे बायेद के आं दौलतखोह अपुले हशम वा [ जामियेत ] खान मशारनुलेपासी येऊन खिजमत नीकोबंदगी वा जांनुपारी दर्गा: वाला जाहिर करणे या बाब दिरंग वा सुस्ती कोलिया येकीन जाणणे की त्यासी बवाजिबी ताकीद होईल म्हणून तादानद छ ८ रमजान सन १०७४ पा हुजूर खुरशेद जुहूर अशरफ अकदस हुमायून आला मो

| | | |
| --- | --- | --- |
| हे. २३<br>हि. १०७५ रजब ४ | २३ | श १५८६ माघ शुद्ध ५<br>इ. १६६५ जानेवारी ११ |

بسم الله الرحمان الرحيم
الملك لله

[ २ ऱ्या अ. आ बा. शि* ]

فرمان همایون شرف صدور یافت آنکه وزارت مآب
چکیگوده فرزند دهمت کوده متوجی بعنایات بیغایات شاهانه
امیدوار بوده بداند که دریں ولا بدرگا[*ه] والا جاه روشن
گردید که هنمت گوده پدر او در مصلحت پادشاهی وفات

1 पाठीवर कानडींत ವೆಂಕಟೇಶನಾಯ ದೊಂಬ ಹಾಗೆ ಒರದ ಸರ್ಕಾ
ರ್ಖಾನರ ಸಂಗಡ ಹೋಗಿಯಿರು ಹಾಗೆ ಮನಸಿತಿ ಫರ್ಮಾನ असा शेरा

یافتم بابران بمراحم بیدریغ شاهانہ میراثہای محلات و جاگیر بالت هنمت کرنده متوفی بآن دولتخواه درگاه مقرر و عنایت فرموده شده است باید کہ بوصول فرمان عنایت عنوان میراثہای محلات و جاگیر برنسبی متوفی بخود مقرر و مرحمت دانستہ و من جمیع الوجوه خاطر خود جمع داشتہ بر جادهٔ عبودیت و نیکوبندگی ثابت قدم بوده باشد وجہ سرافرازی ...... بمعتاد و خلعت فاخره فرستاده شده است باخذ و لبس آن سر باوج آسمان رسانیده دولتخواهی خود بظهور رسانیده باشد تادائد برحکم فرمان اشرف رود تحریراً فی تاریخ چہارم شہر رجب المرجب سنہ ۱۰۷۵

پروانگی حضور خورشید ظہور اشرف اقدس [ *समाप्त* ] همایون اعلی[1]

[ सारांश* ]

२ रा अली आदिलशाह → के. हनुमंतगौडा याचा मुलगा चिक्कप्प गौडा

या वेळीं दरगाहास समजलें कीं, त्याचा बाप हनुमंतगौडा पादशाही मसलतींत मरण पावला. तेव्हां बादशाही कृपेनें के. हनुमंतगौड्याच्या महालांच्या मिरासी व जागीरी या दौलतगोहाकडे मुकर्रर केल्या आहेत. तरी हें फर्मान पोहोंचतांच कैलासवासीच्या उपर्युक्त मिरासी व जागिरी स्वतःस मुकर्रर केल्या आहेत असें जाणून व सर्व तऱ्हेनें मन संतुष्ट ठेवून उत्तम चाकरी व निष्ठा व्यक्त करावी. त्याच्या उत्कर्षाच्या रूपानें ... व पोशाख या वस्तु पाठविल्या आहेत. त्यांच्या स्वीकारांत स्वोत्कर्ष समजून स्वतःची राज्यविषयक निष्ठा प्रकट करावी. फर्मानाप्रमाणें चालावें. ता. ४ रजब सन १०७५ [ हि.* ] हुप.

---

१ पाठीवर कानडींत ಶ್ರೀ || ರ ಚಿಕ್ಕಪ್ಪ ಗೌಡರು...... ಮೊಹರದ ಫರ್ಮಾನ ನಕಲು असा शेरा.

ले. २४
हि. १०७८ जवल २२ } २४ { श. १५८९ कार्तिक वद्य ८
इ. १६६७ आक्टोबर ३०

بسم الله الرحمان الرحيم
الملك لله

[२ =या अ. आ. चा. शि.* ]

فرمان همايون شرف صدور يافت آنکه ورارث مآب هنمنت گونده بعنايات بيعايات شاهانه اميدوار بوده بداند که هرپن هلی کار متمردی پيدا ساخته ولايت پادشاهی را تشويش داده و سمت هرگلی معامله بنکاپوررا قبض ساخته پيشتر ولايت محروسه را قابض کردن می خواست درين ميان آن دولت خواه با هرپن‌هلی‌کار جنگ و جدل کرده اورا شکست داد و ولايت پادشاهی را حراست نمود و دولت خواهی و عقيدت مندی خود ظهور آورده ازين مقدمه مجرای کلی آن دولت خواه شد و شادباشی فرموده جهته مزيد سرافرازی او خلعت فاخره فرستاده شده است باخذ و لبس آن سرافراز گشته سمت هرگلی از دست هرپن هلی‌کار رهانيده در قبض متعلقان خاص حيل واگذارد و من بعد هرپن هلی‌کاررا در سمت مذکور دخل شدن ندهند و درين ضمن موجب مزيد سرافرازی خود داند تحريراً فی تاريخ بست و دوم شهر جمادی‌الاول سنه ۱۰۷۸

بروانگی حضور خورشيد ظهور اشرف اقدس [समाप्त*]
همايون اعلی[1]

[ सारांश* ]

२ रा अली आदिलशाह → हनुमंतगौडा

हरपनहळ्ळीचे लोक धुडगूस सुरू करून पादशाही प्रदेशास त्रास देत आहेत व बंकापूर मामलतीपैकी समत हरगली काबीज करून पुढें रक्षित असा प्रदेश हस्तगत करूं इच्छीत होते. इतक्यांत त्या राजनिष्ठानें हरपनहळ्ळीकरांशीं लढाई करून त्यांस मोडिलें,

---

१ पाठीवर कानडींत [illegible] व मोडींत 'चिकणगौडा या फर्मान' असे शेरे.

पादशाही प्रदेशाचें रक्षण केलें आणि स्वतःची निष्ठा व्यक्त केली. यामुळें त्यानें कार्य पूर्ण पसंतीस आलें. त्यास शाबासकी असून त्यानें जास्त ऊर्जित करण्यासाठी पोशाख पाठविला आहे. यायोगें त्यानें उत्कर्ष पावून व हरपनहळ्ळीकरांच्या हातून हडगली समत सोडवून सासरेंलांच्या मुतालिकांच्या ताब्यांत द्यावी. यापुढें हरपनहळ्ळीकरांना वरील समतमध्यें दखलादखल करूं देऊं नये. यांत स्वतःच्या जास्त उत्कर्षाची योग्यता आहे असें समजावें. ता. २२ जंमादिलावल सन १०७८[हि.*]. हुप.

| | | |
|---|---|---|
| नं. २५<br>हि. १०८१ शाबान ७ | २५ | श. १५९२ पौष शुद्ध ९<br>इ. १६७० डिसेंबर १० |

بسم الله الرحمان الرحیم
المالک لله
[ २ च्या अ. आ. पा. शि *]

فرمان همایون شرف صدور یافت [1]تکر وزارت مآب فلملت گوند، بعنایت شاهانه امیدوار بوده بداند که دربن ولا سیادت و نقابت پناه شجاعت و شهامت دستگاه سوار میدان جلادت سوار ساعد بسالت [دولت]خواه‌زاده درگاه والا جاه [حبیب] شاه و سید مخدوم فرزندان شرزه خان را ......... کاری نامزد فرموده‌ایم و برای سرافرازی آن دولتخواه خلعت شاهی از حضور پرنور فرستاده شده است باید که باخذ و لبس آن سرافراز و ممتاز گشته با سواران و احشام خود ملحق بمشارالیهما شده نوعی مشقت و جان‌نثاری بمطابعت مشارالیهما بظهور رساند دربن ضمن باعث سرافرازی خود دانسته بزودی زود ملحق بمشارالیهما شده حسب الامر اشرف عمل نماید ساعتی درنگ و اهمال بورزد تاداسد تحریراً فی تاریخ هفتم شهر شعبان المعظم سنه ۱۰۸۱

[पाठीवर*] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی[1]

---

१ पाठीवर कानडींत ಹಬಿಬಶಾಹ ಸೈದ ಮೊಖದುಮ ಸರ್ದಾರಖಾನರ ಸಂಗಡ ಮುಸಲತಿಗೆ ಹೋಗ ಹೇಳಿ ಬಂದ ಫರ್ಮಾನ आणि मोडींत 'फर्मान' व 'हणमंतगौडा' असे शेरे.

رساند که دریں ضمن باعث سرافرازی و سربلندی اوست
تاداند تحریراً فی التاریخ ۵ ماه صفرالمظفر سنه ۱۰۹۶ ۰

پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس [ समासांत* ]
همایون اعلی

[ सारांश* ]

सिकंदर आदिलशाह→ श्रीनिवास वेंकटाद्री देसाई परगणे गदग.

सच्यां जमशीदखानानें विनंती केल्यामुळें आणि रुद्रो चिमणाजी पंडित सरद बीर याचा अर्ज आल्यामुळें स्वतःची निष्ठा व चाकरी आणि स्वतःच्या मुलास स्वार व पावलोक यांच्या जमावास हुजूरकडे पाठविणें यासंबंधी हकीगत हजरतांस समजून फार पसंत पडली. त्यावर विजारतीची कृपा केली आहे. हीमध्यें स्वोत्कर्ष समजून जलदीनें स्वतःच्या मुलास जमावासह हुजूरकडे पाठवून द्यावेत आणि निष्ठा व्यक्त करावी. यांत त्याच्या उत्कर्षाचें कारण आहे. ता. ५ सफर सन १०९६ [ हि.* ], सु. १०८५ हुप-

---

ले. ८८ } ५५ { श. १६०६ माघ शुद्ध ५
हि. १०९६ रबल ३ } { इ. १६८५ जानेवारी २९

بسم الله الرحمان الرحیم
الملک الله

[ श्री शि* ]

۱ فرمان همایون شرف صدور یافت آنکه وزارت مآب
سری نواس ویکناڈری بعنایات بے غایات شاهانه ممتاز و سرافراز
بوده بداند که حقیقت فدویت و دولت خواهی آن دولت
خواه عزت و رفعت دستگاه شجاعت و شهامت نشان جمشید
خان عرض نموده و عریضه نوشتی مشهور الحضرت مومورالرتبت
ردرو جمناجی پندیت سردیر بمسامع جاه و جلال رسیده
بنابران از راه مراحم پادشاهانه و فرط عواطف خسروانه
وزارت پانصد سوار بار مقرر فرموده ایم آنرا سرانجام حاکم
ولایت بر تابعات خواهد شد دران ولایت مرحمت خواهیم
فرمود دریں باب خاطر بر جمیع الوجوه جمع داشته همراه

بدیت مشارالیه بروندی تمام فرزند خودرا با شخص معتبر معه جمعیت سواران و احشام روانهٔ حضور فائزالنور نماید درین باب خان مشارالیه را حکم فرموده شده است چنانچه بنویسد بدان موجب آثار دولتخواهی و حلال‌نمکی بظهور رساند حسب الحکم اشرف اقدس بعمل آرد تا داند تحریراً فی التاریخ ۳ ماه ربیع الاول سنه ۱۰۹۶

[समाप्त*] پروانگی حضور خورشید ظهور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

सिकंदर आदिलशाह→ श्रीनिवास वेंकटाद्री.

त्याची चाकरी व निष्ठा याविषयीं जमशीदखान यानें विनंती केल्यामुळें व रुद्रो चिमणाजी सरदबीर यानें अर्ज केल्यामुळें आमच्या ध्यानांत आलें. त्याजवर पांचशे स्वारांच्या विजारतीची कृपा केली आहे. त्यासाठीं नवीन जिंकलेल्या प्रदेशांत जागीरीची व्यवस्था होईल. या बाबतींत मन सर्व तऱ्हेनें संतुष्ट ठेवून उपर्युक्त पंडिताबरोबर तांतडीनें स्वतःचा मुलगा आणि स्वार व पावलोक यांसह एक विश्वासू यांस हुजूरकडे धाडून द्यावें. या-बाबतींत उपर्युक्त खानास हुकूम फर्माविला आहे. तो लिहील त्याप्रमाणें कार्यनिष्ठा व्यक्त करावी. ता. ३ रबिलावल सन १०९६ [ हि.* ] हुप.

---

ले. ८९ सु. } ५६ {श. १६१२ चैत्र शुद्ध ६
जु ३३ जसर ४ } {इ. १६९० मार्च ६

بسم سبحانه و تعالی شانه

[औरंगजेबाचा मा शि व मुद्रा*]

درین وقت میملک علوان بعرض اشرف اقدس اعلی رسید که سری‌پت پسر برادر کلان سری نواس دیسمکهه پرگنهٔ کدک و بارکوده پرگنه بادامی تعهد نموده که اگر از درگاه فلک بارگاه خدمت دیسمکهی پرگنه کدک و بارکوده بدستور عم مشارالیه بار تفویض یابد ملک کلقرا و غیرها در قلعه را که در تصرف ونکت است ازو انتزاع نموده به بندهای بادشاهی

سپارد و در باب اداء یک لک روپیه پیش‌کش و پنج هزار
هون هرسال از جملهٔ رسوم خویش حسب النص عمل آرد
نادری از پیشگاه خلافت و جهان پروری خدمت دیسمکهی
پرگنه گدک و نارگوندا پرگنه بادامی نسبت به مذکور مرحمت
گردید باید که بلوازم و مراسم آن کماینبغی پرداخته دقیقه از
دقایق دولت‌خواهی و بندگی نامرعی نگذارد و در باب
پیش کش مسطور وعده مطابق قرارداد خویش که در ظهر این
مثال واجب الامتثال مقدس معلی نگارش یافته عمل نماید چهارم
جمادی الاخره سال سی و سوم از جلوس والا تحریر یافت

برسالهٔ سیادت و نقابت پناه شرافت و نجابت [ पाठांतर* ]
دستگاه عمده وزراء رفیع الشان زبده امراء بلند مکان ناظم مناظم
ملک و مال ناظم مناظم دولت و اقبال خان شجاعت نشان
جملة الملک مدار المهام اسد خان

[ सारांश* ]

आलमगीर बादशाह→

सध्या समजलें कीं, गदग परगण्याचा देशमुख व बदामी परगण्याचा नाडगौडा श्रीनिवास याच्या थोरल्या भावाचा मुलगा श्रीपति यानें कबूल केलें कीं, कुलत्याप्रमाणें मजकडे उपर्युक्त देशमुखी व नाडगौडकी मुकरर झाल्यास वेंकटाच्या ताब्यात असलेले कलकेरा वगैरे दोन किल्ले त्याजकडून घेऊन बादशाही नोकराच्या ताब्यात देईन येणाऱ्या स्वतःच्या रसुमांतून एक लाख रुपये व पाच हजार होन पेशकश देईन म्हणून उपर्युक्त देशमुखी व नाडगौडकी श्रीपतीकडे दिली आहे तरी त्याचीं कामें उत्तम तऱ्हेनें करावीं व कबूल केल्याप्रमाणें पेशकश द्यावी ता ४ जमादिलाखर सन ३३ जलूस [ आलमगीरी* ] असदखानाच्या योगें हें फर्मान मिळालें

१ पाठांतर फार्सी शेरे व तपशील आणि मोडींत 'परवाना आलमगीरी पादशाहाचे श्रीपतराव म्हणार मेल्यावर त्याचे वडे भाइचे लेक श्रीनिवास देसाई यास लाख रुपे नजर घेऊन अधिकारी करून कलकेरी ता बदल दिल्हे पुढे हरसाल गदग देशमुखी या मी नाडगौडा व कलकेरी समत सुधा ५००० देवन ... वरून दिल्हे सनद पत्र' असा मजकूर

# ३ संकीर्ण पत्रें.

या प्रकरणांत सहा कागद छापले आहेत. पैकीं पहिला श्री. गुरुपय्या निसरहळ्ळि देसाई यांजकडील, पुढले दोन ओटव ( रत्नागिरी ) येथील श्री. अच्युतराव व नारायणराव प्रभुदेसाई याजकडील व श्री म.न. केळकर यांज कडून मिळालेले आणि शेवटचे तीन लक्ष्मेश्वर ( धारवाड ) येथील श्री. शंकरप्पा सानगौडा देसाई यांजकडील आहेत.

| | | |
|---|---|---|
| ठे. ९० सु. १०५६<br>हि. १०६६ रवल २७ | १ | श. १५७७ पौष वद्य १४<br>इ. १६५६ जानेवारी १५ |

بسم الله الرحمان الرحیم

الملک لله

[ मुहम्मद आदिलचा मो. वा. रि.* ]

فرمان همایون شرف صدور یافت بجانب دیسایان و دیس کلکرلیان و نارگران قلعه کوپل آنکه از شهور سنه سته خمسین و الف درین ولا حاجب عزت و رفعت دستگاه حشمت و ابهت انتما انیس مجلس هم جاهی محرم اسرار پادشاهی خان عظیم الشان بلند قدر والا مکان اعتبار خان بدرگاه معلی التماس نمود که اورج نایک در ولایت قلعه مذکور موضع شیوپور و موضع اینگلگیره حمله دو دیه و کاولی و ورتم و علم و بعضی سالا باد کمایش کرده معمورد حالا دیها مذکور و کاولی و ورتم و علم و بعضی بر سبب سالا باد قاصر شدن و کمایش کردن نمی دهند و قلعه کدک گیری را استعداد و استواری نیاید درین باب فرمان قضا جریان شاهی صادر شود که دیها و ورتم و کاولی و علم و بعضی بر سبب سالاباد کمایش و مابقی کردن ندهند بنابران بخاطر مبارک اعلی آورده موضع شیوپور و موضع اینگلگیره و کاولی و ورتم و علم و بعضی از ولایت قلعه مذکور بر سبب کمایش نایک مشارالیه باستعداد و استواری قلعه کدک گیری مذکور مرحمت فرموده دهانیده شده است می باید که دو دیه و کاولی و ورتم و علم و بعضی ولایت قلعه

مذکور بر نسبت نایک مذکور دسالی قلعہ کنک گیری مذکور نمایند و ادا سازند بر حکم فرمان اشرف روند تحریراً فی تاریخ بیست و هفتم شهر ربیع الاول سنہ ۱۰۶۶

[ समासात* ] پروانگی حضور خورشید ظہور اشرف اقدس همایون اعلی

[ सारांश* ]

मुहम्मद आदिलशाह → कोप्पळ किल्ल्याचे देसाई, देशकुळकर्णी व नाडगीर.

अअतवारखानाच्या हेजिबानें विनती केली कीं, ऊडच नायक, या किल्ल्याखालचीं शीवपूर व ईगलगेरे हीं गावें आणि कावली, वर्तना, गला व इतर यांची सालोसाल कमावीस करून खात आहे सध्या त्यांवरील अधिकारी तसें करूं देत नाहींत. त्यामुळें कनकगिरी किल्ल्याची तयारी व डागडुजी राहात नाहीं. वरील बाबतींत फर्मान व्हावें. तरी उपर्युक्त नायकास वरील तपशीलाप्रमाणें कमावीस करूं द्यावी. म्हणजे कनकागिरीची तयारी व डागडुजी राहील. ता. २७ रबिलावल सन १०६६ [ हि.* ], सुस-१०५६. हुप.

---

ले. ९१ सु. १०६२ } २ { श. १५८३ आश्विन?
हि. १०७२ [ सफर ? ] } { इ. १६६१ सप्टें–आक्टोबर ?

بسم الله الرحمن الرحیم
الملک لله

[ २ ऱ्या अली आदिलचा वा शि * ]

فرمان همایون شرف صدور یافت بجانب سرگروهان و نایک واریان و دیسایان تپه سالسی آنکہ از شهور سنہ اثنی ستین و الف چون تپه مذکور باستقامت نواب ملک جناب گردون ومار سلطنت مدار ایالت و حکومت پناه شوکت و حشمت دستگاه مسند نواب کامگاری مهد مراسم جهانداری بدر عالی قدر نامداری گوهر کان بختیاری مقبول سلاطین کبار مشهور خواقین عالی مقدار موسس مبانی جلالت آصف رتبت ارسطو حکمت افلاطون دانش بطلیموس بینش دستور اعظم الشان ذی العز

والکرم و الامتنان ثانی حاتم حاه [و*] تمکین مدره اقالیم الارض
در دریای جود نقطه دائره وجود مطلع خورشید کمال منبع تائید
ذوالجلال نور حدیقه آفرینش نور حدقه بینش آساس آسمان بهتری
دردرج سروری فرازنده رایات علو مراتب طرازنده آیات سمو
مناقب شاه بیت قصیده نوع انسان محیط مرکز رافت و امتنان
مدوه خواص بلند مکان خلاصه اعظم و اماجد دوران
امن و امان نواب مصطفی خان روانست درین ولا بحضور
اشرف روشن گردید که مذهو متعلق راجه حرام خواری پیدا
نموده تهانه‌دار تپه مذکور را بناحق کشته مبلغی مال و منال
گرفته بولایت تپه مذکور تشویش می رساند و زر برداشت
می نماید این چه معنی دارد و چه حد و اندازه اوست
اکنون می باید که بمجرد وصول فرمان شاهی مذهو متعلق
راجه و راجه مذکور را چنان گوشمال دهند که من بعد در
تپه مذکور دخل نشود و حالا در باب گوشمال دادن انها به
صوبه‌دار نیز فرمان اشرف اصدار یافته است که به باب
امداد شما با نموده حرام خوار .. سنه ۱۰۷۲

پروانگی حضور اشرف اقدس همایون اعلی [ समासात* ]

[ सारांश* ]

२ अली आदिलशाह→ सरगिरोह, नायकवाडी व देसाई तपे साळशी.

तपे मजकूर नवाव मुस्तफाखान याजकडे दिल्यामुळें त्याजकड चालत आहे. सध्यां आम्हांस समजलें कीं, राजाचा मुतालीक मघू ( मुधो ) हराम-खोरी पैदा करून तपे मजकूरच्या ठाणेदारास जिवें मारून व पैसा अडका घेऊन तपे मजकूरच्या विलायतीस तसवीस देत आहे आणि पैसा उखळीत आहे याचा अर्थ काय ? हें केवढें धार्ष्ट्य ? तरी हें फर्मान पोहोंच-ताच राजाचा मुतालीक मघू ( मुघो ) व राजा यास अशी शिक्षा द्यावी कीं, या उपर तपे मजकुरात घालमेल होणार नाहीं. सध्यां त्याना शिक्षा करण्याचे बाबतींत सुभेदारासही फर्मान सुटलें आहे कीं, हरत हेनें तुमची मदत करून...... [सफर] सन १०७२ [ हि. * ], सुस १०६२ हुप.

| | | |
|---|---|---|
| शे. ९२ मु. १०६२<br>हि. १०७२ जमल ७ | २ | श. १५८३ पौष शुद्ध १०<br>इ. १६६१ डिसेंबर २० |

بسم الله الرحمان الرحيم
الملك لله

[ २ऱ्या अली आदिलचा फा. लि.* ]

نرمان همایون شرف صدور یافت بجانب دیسایان تپہ سالسی آنکہ از شہور سنہ اثنی ستین الف چون تپہ مذکور باستقامت[1] نواب مصطفی خان برحکم فرمان[1] اشرف روالسعہ درین ولا بدرگاہ معلی روشن گردید کہ مشہور الحضرت موفور الرتبہ باباجی شام ... مجلسی و صوبہ دار تل کوکن در ولایت تپہ مذکور آمدہ تشویش دادہ خراب نمودہ مطلق صاداوار کردہ است هرگاہ کہ تپہ مذکور باستقامت نواب معزالیہ برحکم فرمان اشرف روان باشد پندیت مشارالیہ در ولایت تپہ مذکور آمدہ مطلق صادلوار نمودہ ولایت خراب کردن و عاملان تپہ مذبور را طلبیدہ تشویش دادن چہ اندازہ دارد اکنون می باید کہ بوصول فرمان قضا جریان شاهی پندیت مشارالیہ را در ولایت تپہ مذکور دخل شدن ندهند درین باب تاکید بلیغ دانستہ حسب الفرمودہ اشرف ... بعمل آورند تحریراً فی التاریخ ماہ جمادی الاول سنہ ۱۰۷۲

پروانگی حضور خورشید ظہور اشرف اقدس [ समासांत* ]
همایون اعلی

[ सारांश* ]

• दुसरा अली आदिलशाह → देसाई तपे साळशी

तपे मजकूर बादशाही फर्मानाप्रमाणें नबाब मुस्तफाखान याच्याकडे सोंपविल्यावरून त्याजकडे चालूं आहे. सध्यां आम्हांस दिसून आलें कीं, बाबाजी शाम...( पंडित ? ) मजलिसी व सुभेदार तळकोकण यानें तपे मजकूरच्या

१ येथून पुढें आलेले अल्फाज हुबेहूब वरच्या फर्मानातल्याप्रमाणें आहेत म्हणून ते

विलायतींत येऊन, तसवीस देऊन न खराब करून [?] सादिलवाराची रकम आकारली आहे पण तपे मजकूर वरील नवाबाकडे सोपविल्यावर उपर्युक्त पडितानें सादिलवाराची रकम आकारावी, विलायत खराब करावी आणि तपे मजकूरच्या अधिकाऱ्याना तलब करून तसवीस द्यावी ह केवढें धाष्ट्य ? आता हें फर्मान पावताच उपर्युक्त पडितास तपे मजकुरात घालमेल करू देऊ नये या बाबतींत बरी ताकीद जाणावी ता ७ जमादि-लावल सन १०७२ [ हि * ], जुस १०६२ हुप

---

| | | |
|---|---|---|
| ले ९३ जु ४० (आलमगीरी) रमजान १ | ४ باسم عراسمم | श १६१८ चैत्र शुद्ध ३ इ १६९६ मार्च २५ |

[ फा फा अनोव्हसी मी * ]

درس وب امر مطع العدر و الشاں علو ںعاد ںاب کر موصع
ودوںی ںاب انعام وںکںاے دںساںی گدک کم بسب مںاںشم
و مںارعم سری ںب حاں گوںدای رمں دار لکھںسر منصرب
شدہ ہرگاہ حاںگوںدا ںملا[ر]مب عالی مسعد گردد ںصرب او
واگداشںم حواھد شد و اگر در رسدں ںرکاب ںصرب اںاب
ںعرد، ںعںی و حلل حراھد گرداںد سںم واںعی رسااںد، موصع
مروںم دوںکںاء مسطور مرحمب حواھد شد عرہ شہر رمصاں سںہ
چہل حاوس والا علںی شد

[ सारांश* ]

या वेळीं हुकूम होतो कीं, गदगचा देसाई वकटा याचा इनामाच्या बाबतींतील वडनट्टी मौजा श्रीपतबरोबरच्या भांडणामुळें लक्ष्मेश्वरचा जामी-नदार खानगौंडा यानें ताब्यात घेतला आहे खानगौंडा आमच भेटीस आल्यावर तो त्याजकडे दिला जाईल तसें करण्यास तो चुकवील तर योग्य शिक्षा होऊन वरील गांव वेंकटास दिला जाईल ता १ माहे रमजान सन ४० जुलूस

---

ले. ९४ } ५ { श. १६३० आषाढ वद ६
... रसर १९ } हु { इ. १७०८ जून २७

[ पा. फा रि.* [1] ]

• [زبدة] الامثال والاقران خلاصة الاشباه والاعیان کہاں کودا
امیدوار نوازش پادشاهی ... ولا بعرض اشرف ارفع اعلی رسید
که محمد کام بخش باستماع خبر ... ... نایک سمت حیدراباد
مغلوب رعب و هراس گشته اراده فرار دارد حکم جهان
مطاع آسمان شعاع شرف نفاذ یافت که آن زبدة الاقران در
تقدیر آوارگی او بآن سمت بانسداد طرق و گذارم پرداخته
نگذارد که بآن ضلع بدر رود اگر بمقتضای کارطلبی و پیش آمد
خود دستگیر نماید معرای عظم در جناب خلافت و عظمت
می شود و بمنصب پنج هزاری. ذات و پنج هزار سوار و
دو لک روپیه انعام سرافرازی یافته در الامثال امتیاز و
اعزاز خواهد یافت مطابق حکم محکم بعمل خواهد آید ۱۹
ربیع الثانی سنه ... ... جلوس مقدس معلی سمت تحریر یافت
[ बेजा* ]

[ सारांश* ]

खानखानान जफरजंग → खानगौडा

आम्हांस समजलें कीं, मुहम्मद कामबख्श हैदराबाद समतेचा नायक... खबर ऐकताच भिऊन पळून जाण्याची इच्छा करीत आहे. तेव्हां हुकूम होतो कीं, त्या समतेंत त्यास कोंडून धरून बाहेर जाऊं देऊं नये. दक्षता व कर्तबगारी यांयोगें त्यास कैद केलें तर तें आम्हास पसंत पडून पांच हजारी जात व पांच हजार स्वार येवढी मनसब आणि दोन लाख रुपये इनाम मिळेल व आपल्या योग्यतेच्या लोकांत त्याचा समावेश होईल. ता. १९ रबिलाखर सन

१ शिक्यांत ... خانخانان ... ظفر جنگ فدوی شاه عالم بادشاه غازی ... ||| سنه احد असा मजकूर

# प्रस्तुत खंडांतील पत्रांचा कालानुक्रम.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | हि ९९१ शाबान २० | १५०५ भाद्रपद वद्य ७ | १५८३ आगष्ट २९ |
| २ | हि. ९९१ शाबान २२ | १५०५ भाद्रपद वद्य ९ | १५८३ आगष्ट ३१ |
| ३४ | हि. १००९ रमजान १२ | १५२२ फाल्गुन शुद्ध १४ | १६०१ मार्च ७ |
| ३५ | हि. १०११ रमजान ४ | १५२४ फाल्गुन शुद्ध ८ | १६०३ फेब्रुवारी ५ |
| ३६ | हि. १०१३ जिल्हेज ५ | १५२७ वैशाख शुद्ध ६ | १६०५ एप्रिल १४ |
| ३७ | हि. १०२० जिल्काद १६ | १५३३ पौष वद्य २।३ | १६१२ जानेवारी २० |
| ३८ | हि. १०२२ रजब ५ | १५३५ भाद्रपद शुद्ध ६ | १६१३ आगष्ट ११ |
| ३९ | हि. १०२३ रबल ७ | १५३६ वैशाख शुद्ध ८ | १६१४ एप्रिल ७ |
| ४० | हि १०२३ रबल २५ | १५३६ वैशाख वद्य १२ | १६१४ एप्रिल २५ |
| ४१ | हि १०२४ रसर २२ | १५३७ वैशाख वद्य ९ | १६१५ मे ११ |
| ४२ | हि. १०२४ जमल १४ | १५३७ ज्येष्ठ शुद्ध १५ | १६१५ जून १ |
| ४३ | हि. १०२४ जसर ७ | १५३७ आषाढ शुद्ध ८ | १६१५ जून २४ |
| ४४ | हि. १०२५ मोहरम १५ | १५३७ माघ वद्य १ | १६१६ जानेवारी २४ |
| ४५ | हि. १०२६ जसर १५ | १५३९ ज्येष्ठ वद्य २ | १६१७ जून १० |
| ४६ | हि. १०२७ जमर २५ | १५४० ज्येष्ठ वद्य १२ | १६१८ जून ९ |
| ४७ | हि. १०२७ शाबान ३ | १५४० श्रावण शुद्ध ५ | १६१८ जुलै १६ |
| ४८ | हि १०२७ जिल्काद १० | १५४० कार्तिक शुद्ध ११ | १६१८ आक्टोबर १९ |
| ४९ | हि. १०२८ शव्वाल २१ | १५४१ भाद्रपद वद्य ११ | इ. १६१९ सप्टेंबर २३ |
| ५० | हि. १०२९ मोहरम २६ | १५४१ मार्गशीर्ष वद्य १३ | १६१९ डिसेंबर २३ |
| ५१ | हि. १०२९ जमल ९ | १५४२ चैत्र शुद्ध १० | १६२० एप्रिल २ |
| ५२ | हि. १०२९ जिल्काद १४ | १५४२ आश्विन शुद्ध १५ | १६२० आक्टोबर १ |
| ५३ | हि १०२९ जिल्काद अखेर | १५४२ कार्तिक शुद्ध २ | १६२० आक्टोबर १७ |
| ५४ | हि १०२९ जिल्हेज २५ | १५४२ कार्तिक वद्य १२ | १६२० नोव्हेंबर ११ |
| ५५ | हि. १०२९ जिल्हेज २९ | १५४२ मार्गशीर्ष शुद्ध १ | १६२० नोव्हेंबर १५ |
| ५६ | हि. १०३० रबल २६ | १५४२ माघ वद्य १२ | १६२१ फेब्रुवारी ८ |
| ५७ | हि १०३३ रमजान १३ | १५४६ आषाढ शुद्ध १४ | १६२४ जून १८ |
| ५८ | हि १०३४ सफर २३ | १५४६ मार्गशीर्ष वद्य १० | १६२४ नोव्हेंबर २५ |
| ५९ | हि १०३४ रबल ५ | १५४६ पौष शुद्ध ७ | १६२४ डिसेंबर ६ |
| ६० | हि १०३४ जसर १ | १५४७ अधिक चैत्र शुद्ध ३ | १६२५ मार्च १ |
| ६१ | हि १०३५ रसर १४ | १५४७ पौष वद्य १ | १६२६ जानेवारी ३ |
| ६२ | हि १०३५ जवल ५ | १५४७ माघ शुद्ध ६ | १६२६ जानेवारी २३ |
| ६३ | हि. १०३५ जसर १३ | १५४७ फाल्गुन शुद्ध १५ | १६२६ मार्च २ |
| ६४ | सु १०२६ | १५४७–४८ | १६२५–२६ |
| ६५ | हि १०३५ शव्वाल ९ | १५४८ आषाढ शुद्ध १० | १६२६ जून २४ |
| ३ | हि १०३५ जिल्हेज १८ | १५४८ भाद्रपद वद्य ५ | १६२६ आगष्ट ३१ |
| ६६ | हि. १०३५ जिल्हेज २० | १५४८ भाद्रपद वद्य ७ | १६२६ सप्टेंबर २ |
| ६७ | हि. १०३६ रबल १७ | १५४८ मार्गशीर्ष वद्य ३ | १६२६ नोव्हेंबर २६ |
| ४ | हि. १०४० रसर २४ | १५५२ कार्तिक वद्य १० | १६३० नोव्हेंबर १९ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६८ | हि. १०४१ रबल १५ | १५५३ आश्विन वद्य २ | १६३१ आक्टोबर २ |
| ६९ | हि. १०४२ मोहरम १५ | १५५४ श्रावण वद्य २ | १६३२ जुलै ३१ |
| ७० | हि. १०४७ रजब | १५५९ मार्गशीर्ष | १६३७ नोव्हें–डिसेंबर |
| ७१ | हि. १०४८ जमर १५ | १५६० आश्विन वद्य १ | १६३८ आक्टोबर १३ |
| ५ | हि. १०४८ शाबान ३ | १५६० मार्गशीर्ष शुद्ध ४ | १६३८ नोव्हेंबर २९ |
| ७२ | हि. १०४९ शाबान ११ | १५६१ मार्गशीर्ष शुद्ध १२ | १६३९ नोव्हेंबर २७ |
| ७३ | हि. १०५० रबल १२ | १५६२ आषाढ शुद्ध १४ | १६४० जून २२ |
| ७४ | हि. १०५१ जमल १७ | १५६३ श्रावण वद्य ५ | १६४१ आगस्ट १५ |
| ६ | हि. १०५१ शव्वाल ४ | १५६३ पौष शुद्ध ६ | १६४१ डिसेंबर २७ |
| ७ | हि. १०५३ जिल्हेज ९ | १५६५ फाल्गुन शुद्ध ११ | १६४४ फेब्रुवारी ८ |
| ८ | हि. १०५४ शव्वाल १० | १५६६ मार्गशीर्ष शुद्ध ११ | १६४४ नोव्हेंबर ३० |
| ९ | हि. १०५५ जमर १६ | १५६७ श्रावण वद्य २ | १६४५ जुलै ३० |
| १० | हि. १०५८ जिल्हेज २२ | १५७० पौष वद्य ८ | १६४८ डिसेंबर २७ |
| ११ | हि. १०५९ मोहरम २० | १५७० माघ वद्य ६ | १६४९ जानेवारी २४ |
| १२ | हि. १०५९ सफर २७ | १५७० फाल्गुन वद्य १४ | १६४९ मार्च २ |
| १३ | हि. १०५९ जमल २ | १५७१ ज्येष्ठ शुद्ध ४ | १६४९ मे ५ |
| १४ | हि. १०५९ शाबान ११ | १५७१ श्रावण शुद्ध १५ | १६४९ आगस्ट १२ |
| १५ | हि. १०६२ सफर २६ | १५७३ माघ वद्य १३ | १६५२ जानेवारी २८ |
| १६ | हि. १०६५ रबल ८ | १५७६ पौष शुद्ध ६ | १६५५ जानेवारी ३ |
| ७५ | हि. १०६५ रबल १२ | १५७६ पौष शुद्ध १४ | १६५५ जानेवारी ११ |
| ९० | हि. १०६६ रबल २७ | १५७७ पौष वद्य १४ | १६५६ जानेवारी १५ |
| १७ | [हि. १०६७ मोहरम २६] | [१५७८ कार्तिक वद्य १३] | [१६५६ नोव्हेंबर १४] |
| ७६ | हि. १०६७ सफर १५ | १५७८ मार्गशीर्ष वद्य १ | १६५६ नोव्हेंबर २२ |
| १८ | हि. १०६७ रबल २९ | १५७८ माघ शुद्ध १ | १६५७ जानेवारी ५ |
| ७७ | हि. १०६७ रखर १९ | १५७८ माघ वद्य ६ | १६५७ जानेवारी २५ |
| १९ | हि. १०६७ रखर १९ | १५७८ माघ वद्य ६ | १६५७ जानेवारी २५ |
| ७८ | हि. १०६८ रखर १ | १५७९ पौष शुद्ध ३ | १६५७ डिसेंबर २७ |
| ७९ | हि. १०६८ जमल १९ | १५७९ माघ वद्य ५ | १६५८ फेब्रुवारी १२ |
| ८० | हि. १०६९ रखर १९ | १५८० पौष वद्य ५ | १६५९ जानेवारी ३ |
| २० | सु. १०६० | १५८१–८२ | १६५९–६०. |
| २१ | हि. १०७१ शव्वाल ५ | १५८३ ज्येष्ठ शुद्ध ६ | १६६१ मे २४ |
| ८१ | हि. १०७१ जिल्काद १७ | १५८३ आषाढ वद्य ४ | १६६१ जुलै ५ |
| ६१ | हि. १०७२ सफर ? | १५८३ आश्विन ? | १६६१ सप्टें–आक्टोबर ? |
| ६२ | हि. १०७२ जवल ७ | १५८३ पौष शुद्ध १० | १६६१ डिसेंबर २० |
| २२ | हि. १०७४ रमजान ८ | १५८६ चैत्र शुद्ध ११ | १६६४ मार्च १७ |
| २३ | हि. १०७५ रजब ४ | १५८६ माघ शुद्ध ५ | १६६५ जानेवारी ११ |
| ८२ | हि. १०७६ रखर २५ | १५८७ आश्विन वद्य १२ | १६६५ आक्टोबर २५ |
| २४ | हि. १०७८ जवल २२ | १५८९ कार्तिक वद्य ८ | १६६७ आक्टोबर ३० |
| २५ | हि. १०८१ शाबान ७ | १५९२ पौष शुद्ध ९ | १६७० डिसेंबर १० |

# पत्रांवरील टीपा

१–२

हीं पत्रें कालदृष्ट्या फार जुनीं आहेत म्हणून प्रसिद्ध केलीं आहेत.

३

या पत्रांतील कॅंग नायक पूर्वपरिचित आहे. मुहम्मदनामा, शिवतत्त्वरत्नाकर, ताम्रपटशिलालेख इत्यादींतून याचे उल्लेख आले आहेत;[1] पण मुसलमानी साधनांत हें नांव कुलवाचक म्हणून आलेलें आढळतें. त्यावरून कॅंग नायकाच्या कुळांतील विशिष्ट व्यक्ति निश्चित करतां येत नाहींत. कॅंग नायकानें कोणती हरामखोरी केली तें या फर्मानावरून समजत नाहीं.

१०

या फर्मानांत राणे येन्नूर कर्यात मुकासा दिल्याचें नमूद आहे; पण कोणाला तें सांगितलेलें नाहीं. सनदापत्रें पृ. १०४ वर शहाजीनें राणे येन्नूर परगण्याच्या अधिकाऱ्यांना लिहिलेलें मुर्दसत आहे. त्याचा काल श. १५७१ आश्विन शुद्ध १२, इ. १६४९ ऑक्टोबर ७ हा असून त्यांत यावेळीं राणे येन्नूर परगणा शहाजीस मोकासा म्हणून मिळाल्याचें नमूद आहे. येथें शहाजीलाच ही कर्यात दिली असेल काय? शहाजी श. १५७० च्या श्रावणांत अटकेंत पडला आणि हें फर्मान त्याच वर्षाच्या पौषांतलें आहे. यामुळें वरील शंका दृढ होऊं शकत नाहीं.

१२

याच अर्थाचें पण अडीच महिन्यांनीं याचे अगोदर सुटलेलें फर्मान आहे[2]. दरम्यानच्या या अवधींत हणमंत गौडा स्वारीवर कां गेला नाहीं तें समजत नाहीं. कां पूर्वीच्या दिरंगाईनें कामें करण्याच्या पद्धतीचा हा नमुना आहे.

१५

सानगौडा श. १५६६ वैशाख वद्य ७ व श. १५७१ कार्तिक वद्य १३ यांचे दरम्यान केव्हां तरी मेला.[3] पण तदनंतर इब्राहीम मुस्ताखान याची खास नेमणूक करण्याइतकी कॅंचन गौडानें कोणती बंडखोरी केली तें समजण्यास मार्ग नाहीं.

---

१ शिवाजी निबंधावली भाग २ पृ. ७१; सोर्सेस ऑफ् विजयनगर हिस्ट्री पृ. ३५४ व पुढें; भा. इ. सं. मं. त्रैमासिक १८।२, इ. म. इ. सा. सं. ३।८६.
२ ऐफासा खंड २।१४ ३ शिचसा खंड ६।६३, ६४.

१६

चित्रकल म्हणजे म्हैसूर संस्थानांतील चित्रदुर्ग असेल काय ! तेथ नायकाच्या पंडमोरांचें स्वरूप अजून अज्ञात आहे.

१७

हें फर्मान अर्धवटच मिळालें. यांतील तारीख, मेलेला व ज्याला हें पाठवि तो अशा दोघांचीं नांवें, इत्यादि तपशील नाहींसा झाला आहे, पण याचें सामान्य सार असें दिसतें कीं, मुहम्मद आदिलशाहाच्या कारकिर्दींत कोणी कर्ता हनुम गौडा मुहम्मदनगर ( कर्नूल ) मामल्यामध्यें मरण पावला असतां त्याच्या मुला सांत्वन करणें व त्यास स्फूर्ति देणें यासाठीं हें फर्मान पाठविलें.

१८

ऐतिहासिक फार्सी साहित्याच्या पहिल्या खंडांत सानापूरचे घोरपड्यांकडी एक फर्मान छापलें आहे. त्यांत गैलोजी घोरपडे यानें दुसऱ्या अली आदिलशाहा 'आपण जुने चाकर असूनही घेरोखणार आहों व आपणास कुठलाही मोकास वगैरे नाहीं.' अशी विनंति केल्यावरून त्यास पादशाहानें खान मुहम्मदाचा मुल व कर्नाटकाचा सुभेदार मुहम्मद इख्लासखान याजकडे जाऊन पादशाही मसल तींत म्हणजे स्वारींत सामील व्हावें असें आज्ञापिलें आहे[1]. या फर्मानाची तारीख हि. १०६७ सफर २४ ही आहे[2]. मुहम्मद आदिलशाह हि. १०६७ मोहरम २ रोजीं[3] वारला व २ रा अली आदिलशाह गादीवर आला. अर्थात् हें फर्मान त गादीवर आल्यानंतर एक महिन्याच्या आंतच सोडलें आहे. या फर्मानावरून मुहम्म इख्लासखानानें या पूर्वींच पादशाही मसलत सुरू केल्याचें कळतें. म्हणजे इकडे पादशा गादीवर बसतो न बसतो तोंच दुसरीकडे पादशाही स्वारी सुरू झाली होती. अर्थात् य स्वारीचें महत्त्व व जरूरीही तशीच असली पाहिजे हें उघड आहे; मात्र या फर्मानावरू स्वारी कोणावर झाली व तिचें क्षेत्र कोठें होतें याची नीट कल्पना येत नाहीं. फार त येवढें म्हणतां येईल कीं, घोलोजीस कर्नाटकच्या सुभेदारास मिळण्याविषय फर्माविलें आहे त्या अर्थी या स्वारीचें क्षेत्र कर्नाटकांत कोठें तरी होतें. पण प्रस्तुत लेखांक आणि लेखांक ७६ यांमुळें या स्वारीवर आणखी प्रकाश पडत आहे. पैकीं ७६ वा लेखांक हि. १०६७ सफर १५ या तारखेचा[4] आणि फार्सी व मराठी अशा दोन भाषांतील असून त्यांत गदग परगण्याचा देसाई वेंकटाद्रि नागोजी यास खान मुहम्मदचा मुलगा मुहम्मद इख्लासखान या 'बरावरी वजिरासी देउनु कर्नाटकचे सुभेदारी सरफ

१ ले. ६०. २ श. १५७८ मार्गशीर्ष वद्य १०; इ. १६५६ डिसेंबर १. ३ श. १५७८ कार्तिक वद्य १३; इ. १६५६ नोव्हेंबर ४. ४ श. १५७८ मार्गशीर्ष वद्य १; इ. १६५६ नोव्हेंबर २२,

राज करून सीव्या बद्बख्तासी दफे करविण्याबद्दल पाठविले असे तरी तुवा अपुले हशम जमायेतसहीत खान मशारनुलेपासी जाउनु त्याचे रजातलबी असोन मसलद् करून अपुले खिजमत जाहीर करणे' असा हुकूम केला आहे. फार्शी मज कुरांतही वरील आशयाचेच शब्द आहेत खानापूर व गदग अशा दोन्ही फर्मानांत आलेला मुहम्मद इख्लासखान एकच आहे व तारखाही अगदीं जवळच्या असल्यानें इख्लासखानाची स्वारी शिवाजीवरच होती हें निश्चित ठरतें आणि शिवाजी अथवा त्याचे लोक कर्नाटकांत कोठें तरी गडबड करीत होते येवढें अनुमान होतें निश्चित मद्रशाचा मागमूस मात्र यावरूनही लागत नाहीं तो उलगडा प्रस्तुत फर्मानावरून कांहींसा करतां येतो हे फर्मान हि १०६७ रबल २९ या तारखेचें[1] व २ ऱ्या अली आदिलशाहानें गुत्तलच्या हनुमत गौडास धाडलेलें आहे यांत प्रस्तुत गौडास लिंगदहळ्ळि व कोथीहाळ हीं गावें इनाम दिल्याचें नमूद आहे, पण बक्षिसाचें कारण सांगतांना 'हरामखोर सीवा यानें निष्ठे-तून पाय बाहेर गढून व पादशाही विलायतींत धवळाधवळ करून पाय पसरले होते. तेव्हां त्या हरामखोरास दफे करण्यासाठीं खान मुहम्मदचा मुलगा मुहम्मद इख्लासखान यास कर्नाटकची सुभेदारी देऊन उत्तम वजीरा सह पाठविलें होतें त्या प्रसंगात तुम्ही ( हनुमत गौडा ) त्याच्या ( मु इ ) समक्ष मासूर तर्फेत आपल्या लोकांसह सीवाच्या लोकांशीं खूप लढाई दिली व त्यांचा मोड केला' अशी हकीकत नमूद केली आहे यांतही वरील दोन फर्मानांत आलेला मुहम्मद इख्लासखान उल्लिखित आहे, हरामखोर सीवा पण आहे आणि फर्मानाची तारीखही पहिल्या दोन फर्मानानंतर अडीच सवा दोन महिन्यांनीं आहे तेव्हां हेंही वरील स्वारीलाच उद्देशून असलें पाहिजे मासूर हें गाव म्हैसूर संस्थानच्या शिमोगा जिल्ह्या पैकीं शिकारपूर तालुका व धारवाड जिल्ह्यापैकीं हिरेकेरूर अथवा कोड तालुका यांच्या सरहद्दीवर असून धारवाड गॅझिटियरमध्यें त्याजविषयीं थोडी माहिती आहे अगदी त्या या फर्मानामुळें येवढें निश्चित होतें कीं, शिवाजीचे लोक धारवाड जिल्ह्याच्या अगदीं दक्षिण टोकापर्यंत गेले होते, पण तेथें म्हणजे मासूरच्या आसपास त्यांचा पराजय झाला तसेंच ही स्वारी नेमकी केव्हां सुरू झाली तें समजत नसलें तरी मुहम्मद आदिलशाह आसन्नमरण असतां ही चालू होती व त्याच्या मरणानंतर दोन महिन्यांनीं तिजमधील एक भाग संपला असें दिसतें या वेळीं स्वत शिवाजी व त्याचे लोक आणखी कोठें कोठें धुमाकूळ घालीत होते हें समजण्यास साधन नाहीं. शिवापूर शकावलींत श १५७८ आश्विन वद्य १ आणि माघ शुद्ध ६ या दोन दिव-सांचे व शिवाजीच्या हालचाली सांगणारे उल्लेख आहेत,[2] पण मधील काळाचे नाहींत

१ श. १५७८ माघ शुद्ध ७,इ १६५७जानेवारी५ २ शिचप्र पृ ५०, ५५

आणि ही स्वारी नेमकी त्या काळांतच पडते. जेधे शकावलीचीही तीच गत आहे.[1] इतर शकावलींतही ही माहिती आलेली नाहीं. विशेषतः शिवभारतांत शिवाजीच्या या हालचालीचा उल्लेख नसावा हें आश्चर्य होय. अथवा आश्चर्य कसलें ! ज्या कारणानें आलमगीरनाम्यासारख्या ग्रंथांत शायिस्तेखानावर शिवाजीनें घातलेल्या छाप्याचें अथवा शिवाजीनें केलेल्या सुरतेच्या लुटीचें वृत्त गळलें, त्याच कारणानें शिवाजीच्या या स्वारीचें वर्णन शिवभारतांत व इतरत्रही गाळलें गेलें असेल. परमानंदाला वाटलें असावें कीं, आपण तर 'यशांसि शिवराजस्य श्रोतव्यानि' असें श्रोत्या ब्राह्मणांना सांगून बसलों[2] तेव्हां आतां शिवराजाच्या अयशाचें वर्णन कसें करावें ! किंवा मुसलमानी दरबारी वाकेनिवीस बादशाहाच्या अपयशाची नोंद करणें त्याचे क्रोधाच्या भयानें टाळीत. तसेंच येथेंही झालें असेल

ही स्वारी येवढ्यावरच थांबली कीं नाहीं याविषयीं शंका येते. शिवाजीची कटकट अजिबात बंद पडली नसावी. कारण गदग देसायांकडील हि १०६९ जवळ १९ वें फर्मान पुढें छापलें आहे.[3] त्यांत अफ्जलखानास मोठी फौज व कोठली तरी सुभेदारी देऊन पाठविल्याचें सांगून गदगच्या देसायांना त्यास आपल्या जमावासह मदत करण्यास आज्ञापिलें आहे. हें फर्मान ज्यागजागीं फाटून मजकूर नाहींसा झाल्यामुळें अफ्जलखानास कुठें, कोणत्या स्वारीवर पाठविलें तें समजत नाहीं, पण बहुधा शिवाजीच्या हालचालींना पायबंद घालण्यासाठींच त्याची योजना झाली असावी. श. १५८० व १५८१ या आरंभ सालांतही शिवाजीनें तेरदाळ परगण्यांत कांहीं गडबड उडविली होती, मात्र तीत त्यास माघार घ्यावी लागली असें दिसतें. पण तो विषय प्रस्तुत टाचणाच्या कक्षेबाहेरचा आहे. मुहम्मद आदिलशाहाचें दुखणें विकोपास जाणें व राज्याचा पुढील वारस कोण हा प्रश्न उत्पन्न होऊन तशांतच औरंगजेबाची विजापूरवर स्वारी या बाबींनीं विजापुरास जो गोंधळ उडाला त्याचा पुरेपूर फायदा घेण्याचें शिवाजीनें ठरविलें होतें असें वाटतें. यामुळें श. १५७८ मध्यें त्यानें यन्याच प्रकरणांना हात घातला. पैकीं चंद्रराव प्रकरणांत यश मिळालें, तर कर्नाटकांतील स्वारी कांहींशी अंगलट आली.

१९

या वेळीं विजापूरच्या राज्यांत चाकरीची (आणीबाणीची) वेळ येण्यास कारण काय झालें तें नीट समजत नाहीं. मोगलांची स्वारी होणार हें या वेळीं निश्चितपणें माहीत झालें होतें; पण ती प्रत्यक्ष सुरु झाली नव्हती आणि तिचें क्षेत्र विजापूरपासून फार दूर उत्तरेस होतें.

२०

हें धाडण्याचें कारण बहुधा शिवाजी व अफ्जलखान यांचा संघर्ष असावें.

१ शिवप्र पृ. १८. २ शिभा अ. १।२३. ३ लें. ७९

२१

गुत्तलच्या थेट पूर्वेस सुमारें दहा मैलांवर व तुंगभद्रेच्या पलीकडे होळल गांव आहे, पण येथें कोणाची सरहद्द होती तें समजत नाहीं. कदाचित् नेहमीं उठावणी करून विजापूरकरांस त्रास देणाऱ्या हरपनहळ्ळीचे नायकाच्या प्रदेशाची सरहद्द येथें विवक्षित असणें शक्य आहे.

२२

यांत शर्झाखान तोरगळ व मलनाड याच्या स्वारीवर नेमल्याचें सांगितलें आहे. तारीखे अलीमध्यें पादशाह ता. १ शाबान सन १०७२ मध्यें मलनुलच्या स्वारीवर निघाल्याचें सांगितलें आहे.[१] तत्पूर्वी बरेच दिवस शर्झाखान मलनाडच्या स्वारीवर होता. तेव्हां तारीखे अलीच्या हिशेबानें ही स्वारी निदान हि. १०७२ च्या प्रारंभास सुरू झाली असली पाहिजे. पण बुसातमध्यें या प्रसंगाची तारीख १०७३ शाबान १ अशी दिली आहे.[२] मला वाटतें दोन्ही तारखा चुकल्या असून खरी तारीख या फर्मानाच्या तारखेनंतर केव्हां तरी असली पाहिजे.

२३

क्र. २२ च्या फर्मानांत हनुमत गौडास शर्झाखानाच्या मदतीस जाण्याबद्दल हुकूम असून यांत तो पादशाही स्वारीत मरण पावल्याचें सांगितलें आहे. तेव्हां तो बहुधा मलनाडवरील स्वारींत मेला असावा.

२४

एकविसाव्या फर्मानांत शत्रूच्या सरहद्दीचा प्रश्न आला असून त्यावरील टीपेंत मी कदाचित् हरपनहळ्ळीकरांची सरहद्द तेथें विवक्षित असावी असें सुच-विलें आहे, तें या फर्मानामुळें दृढ होतें. यांत हरपनहळ्ळीचा नायक व विजापूरकर यांच्या रेटारेटीचा स्पष्ट उल्लेख आहे. एकविसाव्या लेखांतील होळल हडगलीपासून जवळच आहे.

२५

या फर्मानांत आलेले हमीदशाह व सय्यिद् मख्दूम हे शर्झाखानाचे मुलगे असल्याची माहिती नवीच आहे. या फर्मानांत त्यांची कोणत्या कामावर खास नेमणूक झाली होती हें स्पष्ट केलें नसल्यानें मोठीच हानी झाली आहे.

२६

याचे शिक्यांत خان جہان بہادر ظفر جنگ کوکلتاش سپہ سالار بادشاہ عالمگیر غازی असा मजकूर असल्यानें हा हुकूम खान जहान बहादुराचा आहे हें उघड दिसतें. अब्दुल-करीम बहलोलखान यानें मवासमानास कैद व ठार करून सर्व अधिकार बळकाविल्यावर मो व दुगनी सरदार यांमध्यें जाहन जाहन बिघाड येऊं लागले. शेवटीं [हि १०८७] मोहरम १६ या तारखेस[३] दुगनी

१ हस्तलिखित पृ. १४६. २ पृ. ३६१. ३ इ. स. १५६८ फेब्रुवारी २, इ. १५७६ मार्च २१.

सरदार सय्यिद मख्दूम शर्झासान व अब्दुल-करीम यांमध्यें चकमक उडाली. नं शर्झासान बहादुरखानास खन्दलापूर येथें भेटला. दोघांनीं मिळून अब्दुल-करी पूर्वीप्रमाणें एक सरदार म्हणून रहावें; पण बादशाहीचा कारभार दक्षिणी लोक पाहावा असें घडवून आणण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें बहादुरखानानें ना. रबिलावल रोजीं[1] कुत्युद्दीनखान व इस्लामखान रूमी यांस विजापूरवर चा जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते गेले; पण अब्दुल-करीमनें अलियाबादेनज लढाई देऊन इस्लामखानास ठार व कुत्युद्दीनखानास पराजित केलें. बुसमध्यें अ माहिती आली आहे[2]. या चकमकीनंतर सुमारें पावणे चि महिन्यांनीं हा का लिहिला. तेव्हां अजूनही बहादुरखानाचा विजापूरवर हल्ला करण्याचा विचार है असें दिसतें. मोगली साधनांत यापेक्षां अधिक माहिती नाहीं. पण इस्लामखान मृत्यूची तारीख मासिरे आलमगीरीच्या कलकत्ता प्रतींत ११ रबिलाखर[3] व आ प्रतींत १५ रबिलावल[4] अशी दिली आहे. अब्दुल-करीमनें सिकंदर आदिलशाह कैदेंत टाकल्याचा उल्लेख मात्र कोठेंच नाहीं.

३०

या फर्मानाचा आरंभाचा भाग नाहींसा झाल्यानें यांत कोणता मथाय उ मिळा होता हें समजण्यास मार्ग नाहीं.

३१

माआसमध्यें ता. ६ व १५ (आपा प्रत ११) जिल्हेज हि. १०९७ यांच्य दरम्यान[5] कासिमखानाची धरुरापट्टण नर्फेवर आणि शेख चांदची नेथल्या किल्ले दारीवर नेमणूक झाल्याचें सांगितलें आहे[6]. या कागदाच्या वेळीं कासिमखा आपल्याच जागीं असून शेख चांदच्या जागीं गाजी बेग आलेला दिसतो. य पत्रांतील कानडी मजकुरात बादशाही सैन्यासह कूच करून बाळापूरच्या प्रदेशांत जाण्याविषयीं उल्लेख आला आहे, पण त्याचा हेतू नीट ध्यानात येत नाहीं.

३२

पत्राच्या स्वरूपावरून मागील पत्रांतील कासिमखानच येथें उल्लेखित आहे असें वाटतें. पण माआसमधील उल्लेखावरून कासिमखान औरंगजेबाच्या ४७ व्य जुलूसमध्यें निवर्तत होता असें दिसतें[7]. येथें तर त्यास मरहूम म्हटलें आहे. तेव्हां हा कासिमखान भिन्न तरी असेल किंवा हा लेख व माआसांतील उल्लेख यांमध्यें कांहीं गफलत असेल.

३३

यावर शिक्का किंवा तुघा कांहींच नाहीं. यामुळें हा कागद कोणाकडून व केव्हां सुटला हें निश्चयानें कांहींच सांगतां येत नाहीं. मी हा शाहआलम बहादुराचा आहे असें धरून तारीख घातली आहे.

---

१ ज्येष्ठ वद्य ३०; जून २. २ पृ. ४५०-५१. ३ पृ. १५१.
४ औरंगजेबनामा २-६२. ५ श. १६०८ कार्तिक शुद्ध ८ व वद्य २; इ. १६८६ आक्टोबर १४ व २३. ६ पृ. २८३ ७ पृ. ४७०.

३४, ३५

हीं फर्मानें फार जुनीं आहेत येवढ्यासाठींच प्रसिद्ध केलीं आहेत.

३६

हें व अशाच प्रकारचीं कांहीं फर्मानें येथें प्रसिद्ध करण्याचें कारण म्हणजे तीं राज्यकारभारांतील वेतन विषयाची माहिती देतात हें होय. पगार नाण्यांत ठरवेला असला तरी तो नोकर असेल तेथें किंवा महिन्याच्या महिन्यास न मिळतां एक किंवा अधिक गांवांच्या सरकारी उत्पन्नांतून अर्थात् वसुलीच्या दिवसांत मिळे असें दिसतें. विशिष्ट नोकर कोणत्या हुजूर सर्नांत, कोणाकडे, कामावर ठेवला, त्यास काय पगार ठरविला, कोणाची पगाराची वांटणी काढून या मनुष्यास दिली असल्यास, ती कां व कोणाकडून काढली हा तपशीलही अशा कागदांत दिलेला आढळतो.

३८, ३९, ४१

या तीन फर्मानांत अफरादांचे मुख्य म्हणून तीन निरनिराळे इसम निर्देशिले आहेत. तिघांचीही नेमणूक सु. १०१३ पासूनच झाली आहे. सरनोबत व सरे सरनौबत अधिकाराप्रमाणें सरे अफराद व सर सरे अफराद असे अधिकारी असावे.

४६, ४७, ४९, ५१, ५१,

हीं पांच फर्मानें कारभारांतील पगार विषयाला उद्देशून आहेत. त्यांचा अर्थ सामान्यतः वर आलेल्या अनेक फर्मानांप्रमाणें आहे, पण तो सुस्पष्ट करतां येत नाहीं. म्हणून फक्त पाठच द्यावा लागला आहे.

५२ मध्यें 'दर मस्लिहत कन्दनूल व नूअ वन्ती' असा प्रयोग आला आहे. तेव्हां कन्दनूल व वन्ती या दोन ठिकाणीं आदिलशाही स्वारी चालू होती असें दिसतें.

५३

हें व क्र. ५६ यांवर २ ऱ्या इब्राहीम आदिलशाहाचा पुढील मजकुराचा ठसा आहे. ابوالمظفر ابراهيم عادلشاه حلد ملكه تد. ابدا

५५

या फर्मानांत उल्लेखिलेल्या कन्दनोलच्या मसलतीची अधिक माहिती अद्याप इतिहास कोठें उपलब्ध झालेली नाहीं. ५२ मध्यें तिचा फक्त उल्लेख आहे. कन्दनोल हें कर्नूलचें जुनें अपभ्रष्ट नांव असावें. शुद्ध व इ. स. च्या १६ व्या शतकांतील नांव कन्दनवोलु होतें असें दिसतें.[1] इकन जुबीमध्यें हि. १०३० मध्यें कर्नूल जिंकल्याचें नमूद आहे. तो या स्वारीचाच परिणाम असावा.

---

१ इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि मद्रास प्रेसिडेन्सी पृ. ९९६ क्र. ५०१

५६

२७ रबिलासरला श. १५४२ ची माघ वद्य चतुर्दशी येते. अर्थात् येथें सौर वर्षप्रतिपदेस उद्देशूनच नौरोझ शब्द वापरला आहे. इंग्रजी तारीख ११ मार्च १६२१ ही आहे.

६३

या फर्मानांत उल्लेखिलेल्या मसलतीचा निश्चयात्मक तपशील समजण्यास साधन नाहीं. मलिकंबरनें मरणापूर्वी थोडे दिवस विजापुरी प्रदेशावर स्वारी केली होती तिला उद्देशून हा उल्लेख असेल काय !

६७

या फर्मानांत उल्लेखिलेल्या मसलतीचाही तपशील समजण्यास साधन नाहीं.

६९

या फर्मानाची तारीख हि. १०४२ मोहरम १५ (श. १५५४ श्रावण वद्य २, इ. १६३२ जुलै २७) आहे. यांत मीर अली रजा याजकडे असलेला गदग परगण्यातील सर्व गांवांचा मोकासा दूर करून तो शहाजी भोसल्याचा फर्जंद संभाजी याम दिला असल्याचें सांगितलें आहे. मीर अली रजा कित्ती तरी दिवस धंकापूर मामल्याचा हवालदार होता. तो या सुमारास मेला असेल म्हणून किंवा इतर कांहीं कारणानें त्याजकडून हीं गांवें दूर झालीं असावीं. पण मुख्य मुद्दा संभाजी व त्याजबरोबर शहाजी यांसंबंधीं आहे. संभाजी या वेळीं स्वतंत्र कर्तृत्व दाखवील इतका मोठा असेल काय ! फर्मानाच्या पाठीवर दोन मोठे सूचक वाक्यखंड आहेत ते असे–' शहाजीस मोकासा दिल्हे या फर्मान ' ' देहाये पा गदग हा ( इस्तिकामत ) सवजी भोसला'. यावरून उघड होतें कीं, फर्मानांत जरी संभाजीस मोकासा दिल्याचें लिहिलें आहे तरी तो वस्तुतः शहाजीसच दिलेला होता. या फर्मानाच्या मितीनंतर एका महिन्यांतच शहाजीनें निजामशाही उभारल्याचें जाहीर केलें. अर्थात् फर्मानाचे वेळीं शहाजी त्याच उद्योगांत गढून गेला असला पाहिजे पण याच वेळीं स्वतःच्या उद्योगांत यश मिळेल कीं नाहीं, याविषयीं त्याला शंका येऊन त्यानें आदिलशाहीशीं पक्के सूत्र बांधून ठेवण्याचा प्रयत्न केला असावा. या प्रयत्नाचा एक भाग म्हणून त्यानें आपल्या मुलाच्या नांवानें विजापुराशीं नातें जोडून ठेविलें

७२

श. १५६१ च्या या फर्मानांत लष्करास धान्य व इतर जिन्नस पुरविण्याबद्दल व्यवस्था केली आहे. लश्कर कोठें चाललें होतें हें समजण्यास यांत साधन नसलें तरी बहुधा कर्नाटकावरील स्वारी येथें विवक्षित असावी.

## ७६, ७७

अनुक्रमें १८ व १९ यांच्या टीपा पहाव्या.

## ७९

अफजलखानास फौजेसह कोठें पाठविलें तें या फर्मानांत सांगितलें होतें; पण फर्मान फाटल्यामुळें तो मजकूर नाहींसा झाला आहे. इतर आलेल्या माहितीचाही उपयोग होण्यासारखा नाही. उ. औरंगझेबानें श. १५७८।७९ च्या उत्तरार्ध-पूर्वार्धांत बेदर व कल्याणी जिंके घेण्याचे जे यशस्वी प्रयत्न केले त्यास विरोध करण्यासाठीं अफजलखानास पाठविलें होतें, पण या फर्मानाच्या कालाचे सुमारास तें प्रकरण संपून सुमारें सहा महिने झाले होते. तेव्हां त्याचा येथें कांहीं संबंध दिसत नाहीं.

## ८५

या फर्मानाच्या पाठीवर महंमुदखानाच्या मध्यस्थीनें हें झाल्याचें सांगितलें असून त्याचे मागें अलकाबांची एक मोठी मालिका आहे. तिजसाठीं पहा मुधोळच्या घोरपडे घराण्याचा इतिहास परिशिष्ट अ. पृ. ५३. या मजकुराच्या उजव्या अंगास एक लंबवर्तुळी अस्पष्ट शिक्काही आहे.

## ८६–८८

हीं तिन्ही फर्मानें एकाच विषयाला उद्देशून असून त्यांचा कालही जवळ जवळ एकच आहे. यांत जमशीदखान व खुद्द चिमणाजी सरदेशमुख यांच्या शिफारशीवरून सिकंदर आदिलशाहानें गदगचा देसाई श्रीनिवास वेंकटाद्री यास ५०० स्वारांची सिजारत ( सरदारी ) दिल्याचें नमूद आहे. देसाई वास्तविक पाहिलें तर मुख्यतः मुलकी अधिकारी. त्यास आवर्जून सरदारी देण्याचें कारण काय याचा तपास केला पाहिजे. आम्हां म्हणतो कीं, जानेवारी १६८५ च्या शेवटीं मुअज्जमनें गदग वगैरे ठिकाणें हस्तगत केलीं[1] अर्थात् गदगचे देसायांना एक तर मोंगलाचें अंकीत व्हावयास पाहिजे होतें किंवा आपल्या वतनावर पाणी सोडून आदिलशाही करीत राहावयास पाहिजे होतें. त्यानें उत्तरोत्तर कडे रहावें यासाठीं वरील दोन फर्मानांचें प्रयोजन दिसतें.

## ९१, ९२

श. १५८३ च्या दक्षिण्यात्रारंभानंतरच शिवाजीनें बहुतेक तळकोंकण पादाक्रांत केलें; यामुळें तळकोंकणच्या दक्षिणेस असलेल्या विजापुरी मुलखास शिवाजीच्या स्वाऱ्यांचा कसा त्रास होऊं लागला हें या दोन फर्मानांत दिसतें. ९१ व्या फर्मानांत

[1] हिस्टॉरिकल मिसेलनी पृ १८२ व टीप १०, पृ. ११८; शि. प. सा. ६११.

आलेला गनाचा मुनाजीक मधू हा शिवाजीचा मनुष्य असला पाहिजे हें उघड आहे; पण धाधाजी शाम...पंडित सुभेदार तरफेवरचा हा शिवाजीकडचा असेलसें वाटत नाहीं. या वेळीं शिवाजीचा तरफेवरचा सुभेदार पिलाजी नीळकंठराव होता.[1] विशेषतः धाधाजी शाम...ला पंडित, मजालिसी, सुभेदार या उपाधि लाविल्यामुळें तो शत्रु पक्षाकडील संभवत नाहीं.

९४

औरंगजेबाचे मरणानंतर त्याचे मुलगे बहादुरशाह व कामबक्ष यांमधील विग्रह वाढून पहिला उत्तरेकडून दुसऱ्यावर चालून आला. कामबक्ष मागें हटत हटत जुलूस १ च्या शव्वाल महिन्याच्या अखेरीस हैदराबादेपासून २॥ मजलीवर आला होता. त्यापूर्वी जमादिलाखरच्या आरंभीं तो बऱ्हाणपूरला होता.[2] आणि या पत्रावरून तर रजब १९ च्या पूर्वीच कांहीं दिवस तरी कामबक्ष हैदराबादच्या बाजूस असावा असें दिसतें. तेव्हां हें पत्र व मुन्तखब यांचा मेळ कसा घालावयाचा !

९५

या कागदावर शिक्का नाहीं व जुलूस कोणाचा हेंही निर्दिष्ट नाहीं. यामुळें या कागदाचा ज्यास्त विचार करणें अशक्य आहे.

---

१ शिवकालीन पत्रसारसंग्रह ८५७, ८७१. २ मुन्तखबुल्लुबाब पृ. ६१९, ६१८; इलियट डौसनच्या ७ व्या भागांत या हकीकतीचा सारांश देतांना ती मुन्तखबप्रमाणें दुसऱ्या जुलूसमध्येंच घातला आहे; पण मुन्तखबमध्यें शव्वाल महिना पहिल्या जुलूसचा सांगितला असतां तेवढा उल्लेख इलियट डौसनमध्यें गळला. यामुळें इंग्रजीवर विसंबणारा मनुष्य ही हकीकत दुसऱ्या जुलूसमध्यें झाल्याचें धरील व त्याचा घोटाळा उडेल. मी वरील सर्व विचार करून या लेखांतील १९ रबिलाखर ही तारीख शाहआलम बहादुरशाहाच्या पहिल्या जुलूसमधील धरली आहे. दुसऱ्या जुलूसमधील या तारखेस कामबक्ष प्रकरणाचा निकाल लागून गेला होता.

# ६ आदिलशाही शिक्के

गेल्या सुमारें दहा वर्षांत अदमासें एक हजार आदिलशाही फर्मानें माझ्या पाहण्यांत आलीं त्यांत कांहीं बनावटही आढळलीं कित्येक फाटलीं होतीं व कालनिर्देश नाहींसे झाले होते पण त्या सर्वांचें सम्यक्ज्ञान होण्यास शिक्क्यांची फार मदत झाली इतरांनाही अशीच मदत व्हावी म्हणून मला आढळलेले आदिलशाही शिक्के पुढें देत आहे

या शिक्क्यांचे चार प्रकार करतां येतात (१) फर्मानांचे आरंभीं उठविलेले बादशाही शिक्के, (२) फर्मानाच्या शेवटीं उठविलेले प्रधानांचे शिक्के, (३) फर्मानाच्या शेवटीं उठविलेल्या मोहरा, (४) फर्मानाच्या पाठीवर उठविलेले निरनिराळ्या लोकांचे शिक्के पैकीं दुसऱ्या दोन प्रकारांतील शिक्के लावणें हें अतिशय जिकिरीचें आहे तेव्हां त्याविषयीं येथें कांहीं एक न लिहितां फक्त पहिल्या दोन प्रकारांसंबंधींच विचार करणार आहे

बादशाही शिक्के प्राय स्पष्ट उठलेले आढळतात तेव्हां त्यांचें वाचन प्रयास न पडतां होऊं शकलें पण प्रधानांचे शिक्के प्राय स्पष्ट नसतात आणि मजकुरावर किंवा दुसऱ्या शिक्क्यांवर अर्धवट उठलेले असतात यामुळें कांहीं शिक्क्यांचें समाधानकारक वाचन २५।३० प्रती म रकाइनें अभ्यासूनही देतां आलें नाहीं, पण त्यांचा आकार, व्यास, लागला तेवढा मजकूर, काल, हा तपशील दिला असल्यानें शिक्का ओळखण्यास अडचण पडणार नाहीं

फर्मानाच्या समाप्तींतील मजकूर व खालचे शिक्के यांच्या संबंधाविषयीं येवढेंच म्हणतां येईल कीं, ज्याच्या माहितीनें फर्मान निघालें त्याचा शिक्का बहुधा उठविलेला आढळतो पण कांहीं फर्मानांवर ज्याच्या माहितीनें तें सुटलें त्याचें नांव नमूद असूनही त्याचा शिक्का मात्र नाहीं प्रधानांच्या शिक्क्यांविषयीं असें सामान्य विधान करण्यास हरकत नाहीं कीं ते बहुधा राजकीयेतर फर्मानांवर उठविले जात

अबुल-हसन

(१) अष्टकोन १¾″

نكار ملك شاه جهان محمد شاه

ابوالحسن ورد از بندهاے دولت حرّہ ۱۰۹۳

अबुल-हसन हा मुहम्मद व दुसरा अली यांच्या आदिलशाहाच्या कारकिर्दींत एक प्रसिद्ध व्यक्ति होती ऐकासा ११७५ (हि. १०६५ रजब ११) हें फर्मान याच्या माहितीनें सुटलें आहे शेख अबुल-हसन नामक एका इसमानें विजापूरच्या इतिहासावर एक ग्रंथ लिहिला आहे तो हाच असेल काय ?

हि १०६८ रबि ३ (ऐकासा ११७८) । हि. १०७० रमजान १४ (ऐकासा ११८३)

## अली आदिल १ ला

### ( १ ) नमूना नंबर २४

لا فتح الله على لا سيف الله ذو الفقار
اسد الله الغالب على اس ابی طالب

हा शिक्का मला मुधोळचे राजघराणें[1] घोरपडे यांजकडील आणि सातारा व विजापूर येथील म्यूझियमें यांतील फर्मानांवर[2] पहावयास सांपडला यांचे काळ अनुक्रमें हि. ९७२।१५६४–६५, मु ९७३।१५६४–६५ व हि. ९७४।१५६६–६७ असल्यानें हीं तीनही फर्मानें पहिल्या अली आदिलशाहाच्या कारकिर्दींत पडतात. अली आदिलशाहाचा खून झाल्यावर दुसरा इब्राहीम गादीवर बसला. पण तो लहान असल्यामुळें सर्व अधिकार किश्वरखान नांवाच्या प्रधानानें बळकाविला त्याची सत्ता दुःसह झाल्यामुळें बादशाहासह इतरांनीं त्यास विजापुराहून पळ काढावयास लाविलें, पण बादशाही शिक्काही त्याजबरोबर गेल्यामुळें राजपत्रावर कोणता शिक्का उठवावा असा प्रश्न पडला. तेव्हां रफीउद्दीन शिराझीनें सांगितलें कीं, اسد الله الغالب علی اس ابے طالب हा मजकूर असलेला शिक्का खून झालेल्या बादशाहाच्या बोटावर असे तो शिक्का फर्मानांवर उठविला जाई व तो आज सांनिध्यांत आहे, तोच शिक्का मुद्रित करावा तेव्हां तोच शिक्का कांहीं काळ चालू राहिला, पुढें किश्वरखानाचा खून झाल्यावर त्याच्या गुलामानें त्याजवळचा शिक्का विजापुरास आणला तेव्हां पुन्हा जुना शिक्का मुद्रित झाला असें बुसमध्यें सांगितलें आहे[3] किश्वरखानानंतरचा विजापुरी प्रधान इख्लासखान यास हि. ९९२ मध्यें पदच्युत केलें गेलें अर्थात् त्यापूर्वी केव्हां तरी वरील हकीकत घडली असली पाहिजे.

मी २ ऱ्या इब्राहीम आदिलशाहाचीं फर्मानें पाहिलीं तीं सर्व हि. ९९१ सफर २४ च्या पुढचीं असून त्यांवर केवळ नाद अलीचा शिक्का आढळला उपर्युक्त शिक्का असलेलें इब्राहीमचें फर्मान मी अद्याप पाहिलें नाहीं. पण मला येथें हें लक्षांत आणून द्यावयाचें आहे कीं, बुसमध्यें चर्चिलेल्या शिक्क्यांतील मजकूर उद्धृत करतांना अर्धा भाग निष्काळजीपणानें गाळला आहे.

पहिल्या अली आदिलशाहाच्या हि ९७७ च्या फर्मानांवर नाद अलीचा शिक्का आहे हेंही येथें नमूद करतों[4]

---

१ मुधोळच्या घोरपडे राजघराण्याचा इतिहास परिशिष्ट अ पृ २८
२ अप्रसिद्ध. ३ फार्सी प्रत पृ १६९. ४ ऐकासा २।१७

### अली आदिल २ रा

दुसऱ्या अली आदिलशाहाच्या अगदीं आरंभींच्या फर्मानांवर मात्र अलीचा शिक्का असून नंतर क्रमानें पुढील चार शिक्के वापरण्यांत आलेले आढळतात.

( ३ ) चहुदळी पिंपळपान ४″ × २३/४″

یا علی مدد

مہر شاہے زد ز مہر مرتضی بر مہر و ماہ

خسرو عادل علے بعد از محمد بادشاہ ۱۰۶۸

हि. १०६८ रसर १ ( ऐकासा ३।७८ ) हि. १०७० जवल २७ (ऐकासा २।११,
हि.१०६९ रसर १९ (ऐकासा १।२३) हि. १०७० रजब ७ ( ऐकासा २।११ )
हि.१०७० जवल २ ( शिचसा ४।६८८ ) हि.१०७० रमजान १४ (ऐकासा १।२३)

( ४ ) पिंपळपान १७/८ × २१५/१६″

یا علی مدد

از تولاے علی زد سکہ بر خورشید و ماہ

شاہ دین پرور علے بعد از محمد پادشاہ ۱۰۶۷(؟).

हा शिक्का फक्त एका फर्मानावर आढळला

हि. १०६८ जवल १९ ( ऐकासा ३।७९ )

( ५ ) वर्तुळ २१/२″

بر فرمان سکہ شاہے زد بتائید الہ

بندہ حیدر علی ابن محمد پادشاہ

हि. १०७१ रजब ५ ( ऐकासा १।२४ ) हि १०७३ जवल १५ (ऐकासा२।१२)
हि.१०७१ जिल्काद् १७ (ऐकासा३।८१) हि. १०७४ मोहरम ८ (ऐकासा १।२७)
हि.१०७१ जिल्हेज २३ (ऐकासा१।२५) हि.१०७५रजबशेवट(ऐकासा१।२८-२९)
हि. १०७२ सफर ( ओटव ) हि. १०७६ रसर २५ ( ऐकासा३।८२ )
हि. १०७२ जवल ७ ( ओटव ) हि. १०७८ रसर ११ ( आपटे )
हि.१०७२ रजब ५ ( ऐकासा१।२६)

( ६ ) वर्तुळ २१/२″

مرید لطف شاہ علی پادشاہ

ابن غازے سلطان محمد شاہ

| | |
|---|---|
| हि. १०८१ सफर ३, १७, २० (आपटे) | हि. १०८२ मोहरम २० ( आपटे ) |
| हि. १०८१ शाबान ७ (ऐकासा ३।२५) | हि. १०८२ रमजान १७ ( आपटे ) |
| हि. १०८१ जिल्हेज १९ ( आपटे ) | हि. १०८३ रजब २१ ( आपटे ) |

## आका खुसंव

हा शिक्का मला फक्त एका फर्मानावरच आढळला. आका खुसंव कोणत्या अधिकारावर होता हें समजत नाहीं.

( ७ ) लंबवर्तुळ १½″ × ⅞″

بندهٔ درگاه الٰہی محمد عادلشاہ آقا خسرو سلم ۱۰۵۰

हि. १०६२ मोहरम १३ ( ऐकासा १।२२)

## इख्लासखान

( ८ ) षड्दलमध्य वर्तुळ ⅞″

षड्दलांतः اخلاصخان عادلشاہ

समासांत رساند بحلق خدا ... مند ہر دو سرائے

इख्लासखान ही पदवी आहे. पुढें मुहम्मद, युसुफ व रेहान असे तीन इख्लासखान पदवी धारण करणारे येणार आहेत. याचें नांव काय होतें हें शिक्का पूर्ण न लागल्यानें समजत नाहीं. इब्राहीम आदिलशाहाच्या कारकिर्दीतील हि. १००९ रमजान १२ या तारखेपासून हि. १०३३ रमजान १३ या तारखेपर्यंतच्या मी पाहिलेल्या प्रत्येक फर्मानावर याचा शिक्का आढळला.

## खानभाई

( ९ ) वर्तुळ १″

در(ا) سلطان محمد عادلشاہ کوش دادار

بکار فلک چو مشغول شد نواب خانہائے

हा शिक्का मला नीट लागलेला नाहीं, पण तो नवाब खानभाई याचा आहे हें निश्चित. कारण हा शिक्का असलेल्या कांहीं फर्मानावर برسلم درسالم किंवा کمترین بندگان درگاه شاهلشاہ نواب خان بہائے بندهٔ درگاه شاہ نواب خان بہائے असा मजकूर लिहिलेला आढळतो

हि. १०४५ शाबान १२ ( ऐफासा ११६ )  हि. १०४६ रबर ६ (पोतदार)
हि. १०४५ रमजान १५, १६ ( पोतदार )  हि. १०४६ जवल १,६,१०,२५(पो.)
हि. १०४६ मोहरम ७  ( " )  हि. १०४६ रबी किंवा जुमाद (पो) ५
हि. १०४६ सफर २६  ( " )  हि. १०४६ शाबान १२ ( " )

ख्वाजा कमाल

( १० ) पिंपळपान $1\frac{1}{2}$" × $\frac{7}{8}$"

العاجز ناظم الاوامر والنواهی
اول العباد خواجہ کمال عاد اشاهی

हा कोण होता तें समजत नाहीं.

हि. १०४८ जखर १५ (ऐफासा३।७१)  हि. १०५० रबल १२ ( ऐफासा१।७१ )
हि. १०४८ शाबान २४(ऐफासा१।४४)

गाझी साहिब झमान

( ११ ) वर्तुलमध्य द्वादशकोन $1\frac{3}{4}$"

वर्तुळांत:   غازی صاحب زمان بندہ محمد سلطان

समासांत:... روز جہان سنہ ۱۰۶۲ کرو ا... ن خام جود خان

हा शिक्का मला फक्त एकाच फर्मानावर ( हि. १०६२ मोहरम १३ ऐफासा १।२२ ) आढळला. शिक्का धारण करणाराचें नांव नीट लागलेलें नाहीं. यामुळें त्याच्या पदवीनें त्यास उल्लेखिलें आहे.

दियानतुल्मुल्क

( १२ ) वर्तुळ १"

از داد دیانت پادشاه ملک جناب
داد دیانت الملوک مرا فرحت خطاب

विजापूरच्या उमरावात याचें निश्चित स्थान कोणतें हें ठाऊक नाहीं, पण ऐफासा ३।५३ व ३।५६ हीं फर्मानें अनुक्रमें अमीर जुम्ले व सर मजिलस हे अधिकार असणाऱ्या दियानतुल्मुल्कच्या माहितीनें सुटलीं असून ऐफासा ३।४९-६७ या सर्व कागदांवर हा शिक्का उठविलेला आहे.

दौलतखान

हा शिक्का मला नीट लागलेला नाहीं पण त्यांत वरील नांव आहे हें निश्चित.

( १३ ) लंबवर्तुळ $1\frac{3}{16}$" × $1\frac{3}{4}$"

المتوکل علی الله الملک المنان
اقل العباد فورس دولتخان

ऐ. फा. सा. सं. ३-१४.

| | |
|---|---|
| हि. १०४० रबर ७ (ओग्व) | हि १०४३ रसर २५ (ओग्व) |
| हि १०४१ रबल १५ (ऐकासा ३।६८) | हि. १०४४ मोहरम २६ (पोतदार) |

### नाद अली

( ६४ ) वर्तुळ १५/१६"

نادِ علیا مظہر العجائب تجدہ عوناً لک فی النوائب کل ہم
و غم سینجلی بولایتک یا علی یا علی یا علی

हा एक मुसलमानी मंत्र आहे. इस्माईल व २ रा इब्राहीम यांच्या मी पाहिलेल्या झाडून साऱ्या फर्मानांवर मला हाच शिक्का आढळला. शिवाय मुहम्मद, ग अली व सिकन्दर यांच्या राजवटींतील अगदीं आरंभीं आरंभींच्या फर्मानांवर व १ ल्या अलीच्या कांहीं फर्मानांवर हाच शिक्का उठविलेला आढळून येतो

### मजिलसरान

हा मनुष्य कोणत्या अधिकारावर होता हें समजत नाहीं याचा शिक्काही नीट लागला आहे असें म्हणतां येत नाहीं

( ६५ ) वर्तुळ १"

در سجود شاہ شود امر تشاہے
زیر پا سم ام حطاب معلسحاہے

हा शिक्का गदग-देसायांकडील हि १०२७ जिल्काद १० पासून हि १०३५ जसर १३ पर्यंतच्या प्रत्येक फर्मानावर आढळला

### मुस्तफाखान

हा मुहम्मद आदिलशाहाच्या कारकिर्दीतील एक प्रसिद्ध मुत्सद्दी व सेनापति होता हा हि. १०५८ जिल्काद ३ रोजीं वारला

( ६६ ) वर्तुळ १"

امیں مصطفی خاں     بندہ محمد سلطان ۱۰۳۷

| | |
|---|---|
| हि. १०४० रबल (ओग्व) | हि १०४१ रबल १५ (ऐकासा ३।६८) |
| हि. १०४३ रसर २५ (ओग्व) | हि १०५० जिल्हेज ६ (ऐकासा १।८) |
| हि. १०४५ शाबान १२ (ऐकासा१।६) | हि. १०५१ जबल ११ (ऐकासा१।९,१०) |
| हि १०४७ रजब (एकासा ०।७०) | हि १०५१ जबल १७ (ऐकासा३।७४) |
| हि १०४८ जसर १७ (ऐकासा०।७१) | हि १०५२ सफर ५ (एकासा १।११) |
| हि १०४८ शाबान ३ (एकासा०।५) | हि. १०५२ जबल १७ (एकासा१।१२) |
| हि. १०४८ शाबान २४ (ऐकासा१।७४) | हि १०५५ रसर १७ (एकासा १।१४, १५) |
| हि १०५० रबल १२ (ऐकासा३।७३) | |
| हि. १०५० जिल्हेज ५ (ऐकासा१।७) | हि. १०५५ रमर १६ (ऐकासा१।६९) |

( १७ ) अष्टकोन १·१"

سکہ خادم درگاہ مصطفی خان
بندہ محمد ابراہیم سلطان

या शिक्क्याची प्रतिकृति सध्या मजपाशीं नाहीं. यामुळें याचीं पुन्हा तपासणी करतां आली नाहीं.

हि. १०४७ रजब १७ (मिरज दुर्ग) हि. १०५२ रजब १४।

( १८ ) अष्टकोन १$\frac{१}{१६}$"

خطاب بلند ... حامل امین مصطفی خان
دادار رحیمی محمد سلطان

हा शिक्का फक्त एकाच हिजरी १०६२ मोहरम १३ या तारखेच्या फर्मानांत पहावयास मिळाला. यामुळें वाचन समाधानकारक करतां आलें नाहीं.

मुहम्मद आदिल

( १९ ) वर्तुळ २" व २$\frac{३}{८}$"

شاهنشہ دین محمد ابراہیم
در زیر نگین شاه شد ہفت اقلیم

याच्या मध्यें 'नाद अली' चा मंत्र, त्या भोंवतीं वर दिलेला मजकूर व त्या भोंवतीं किरणमय दुहेरी कडें असतें.

हा एकच शिक्का दोन आकारांत उठविलेला सापडतो. लहान आकाराचा हि. १०५० जिल्हेज ५ (ऐकासा १।७) पासूनच्या पुढील फर्मानांवर आढळतो. तत्पूर्वी नादअलीचा शिक्का उठवीत. हि. १०५९ सफर २७ (ऐकासा ३।१२) नंतर मोठ्या आकाराचा शिक्का उठवूं लागले.

मुहम्मद इख्लासखान

( २० ) बहुदळी पिंपळपान १$\frac{३}{८}$" × १$\frac{३}{४}$" आणि १$\frac{३}{४}$" × २$\frac{३}{१६}$"

ہو القادر
خانہزاد علی عادلشاہ محمد اخلاصخان

हा २ ऱ्या अलीचा अगदीं आरंभींचा प्रधान खान मुहम्मद याचा मुलगा होता. यासच शिवाजीनें कर्नाटकांत केलेल्या पहिल्या स्वारीचा प्रतिकार करण्यास पाठविलें होतें (पहा हेंच पुस्तक पृ. ११६ टीप १८)

हि. १०६८ रसर १ (ऐकासा ३।५८) हि. १०७० रमजान १४ (ऐकासा ३।६३)

## यूसुफ इख्लासखान

(२१) वतुळ १"

یوسف اخلاصخان     بنده محمد سلطان

हा कोण होता तें ठाऊक नाहीं, पण याचा शिक्का मात्र अनेक फर्मानां वर आढळला

| | |
|---|---|
| हि. १०४५ रमजान १५ (पोतदार) | हि १०४६ जवल १ (पोतदार) |
| हि १०४५ रमजान १६ " | हि १०४६ जवल ४ " |
| हि १०४६ मोहरम ७ " | हि १०४६ जवल २५ " |
| हि. १०४६ सफर २४ " | हि १०४६ शाबान १२ " |
| हि. १०४६ रसर ६ " | |

## रेहान

(२२) एकादशकोन १ ५/१६"

ز دادار سلطان محمد خسرو دنیا و دین

نقش مهر ریحان اخلاصخان عرجان

इख्लासखान पदवी धारण करणाऱ्या रेहानचा हा शिक्का आहे.

| | |
|---|---|
| हि १०४७ रजब (एफासा ०।७०) | हि १०५२ सफर ५ (ऐफासा१।११) |
| हि १०५० जिल्हेज ५ (ऐफासा१।७) | हि १०५२ जवल १७ (ऐफासा१।१२) |
| हि १०५० जिल्हेज ६ (एफासा१।८) | हि १०५५ रसर १५ (ऐफासा१।१४, १५) |
| हि १०५१ जवल११ (ऐफासा१।९,१०) | |
| हि १०५१ जवल १७ (एफासा१।७४) | हि १०५५ रसर १६ (ऐफासा१।६९) |

## शाहनवाझखान

शाहनवाझखान हा पदवी आहे याचें नांव काय होतें हे समजत नाहीं २ या इब्राहीमच्या कारकिर्दीत एक प्रसिद्ध शाहनवाझखान होऊन गेला. तोच हा असेल का नाहीं तें सांगतां येत नाहीं २ ऱ्या इब्राहीमचीं कित्येक फर्मानें शाहनवाझखानाच्या माहितीनें निघालीं आहेत हा व शिक्केकरी एक कीं दोन हेंहीं सांगता येत नाहीं

(२३) वर्तुलमध्य वतुळ १ ५/१६"

समासात در سایه پادشاه عادل مشهور جهان چو اسلام

۱۰۰۸

वर्तुळामध्येः از دولت شه ملک حسام شاه نواز خان شد حطام

००९रमजान १२ (ऐफासा३१३७) हि १०३४ जमर १ (ऐफासा ३१६०)
०११ रमजान ४ (ऐफासा ३१३५) हि १०३५ रसर १४ (ऐफासा ३१६१)
०१३ जिल्हेज ५ (ऐफासा ३१३६) हि १०३५ जवल ५ (ऐफासा ३१६२)
०१८ रमजान २६ (ओरघ) हि १०३५ जमर १३ (ऐफासा ३१६३)
०२०जिल्काद १६ (ऐफासा ३१३७) हि १०४८ जमर १५ (ऐफासा ३१७१)
०३४ रवल ५ (ऐफासा ३१५९) हि १०४८ शाबान २४ (ऐफासा ११४४)

(२४) शाहनवाझखानाचा आणखी एक वाटोळा १½ इंच व्यासाचा शिक्का उपलब्ध आहे. तो अजून चांगला लागला नाही पण त्यांत جہاں شد نواب ... دار خطاب شد ابن خطا .. شد نوار جاں इत्यादि मजकूर आहे

१०२२ रजब ५ (ऐफासा ३१३८) हि १०२५ मोहरम १५ (ऐफासा ३१४४)
१०२३ रवल ७ (एफासा३१३९) हि. १०२६ जमर १५ (एफासा ३१४५)
१०२३ रवल २५ (ऐफासा ३१४०, हि १०२७ जमर २५ (ऐफासा ३१४६)
१०२४ रसर २२ (ऐफासा ३१४१) हि १०२७ शाबान ३ (ऐफासा३१४७)
१०२४जवल २४ (ऐफासा ३१४२) हि १०२७ जिल्काद १० (ऐफासा३१४८)
१०२४ जमर ७ (ऐफासा ३१४३)

## सिकंदर आदिल

(२५) वर्तुळ १½"

سلطان سکندر بادرسے ابن عادلشاہ علی

याच्या कारकिर्दीच्या अगदी आरंभी नाद अलीचा शिक्का फर्मानावर सांपडतो. नंतर हा शिक्का उठूं लागतो याचा प्रथम प्रयोग हि. १०८९ साबान २८ तारखेच्या फर्मानावर केलेला दिसतो (पहा मुधोळच्या घोरपडे घराण्याचा इतिहास परिशिष्ट पृ १२६) याचा आणखी एक शिक्का आहे तो असा—

(२६) चौकोन १" × ¾"

مدد یا محی الدین

याचा पहिला उपयोग मला हि १०९५ जमर १९ या तारखेच्या फर्मानावर आढळला

